


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# यंत्रसामुग्रीच्या अधिकाधिक कारखानदारांची विश्वसनीय



## किर्लोस्कर डिझेल एंजिनें



टाइप एव्ही आणि जेव्ही
५ ते १५ हॉर्स पॉवर



टाइप व्ही २-२० ते २५ हॉर्स पॉवर











टाइप व्ही ४-४० ते ४८ हॉर्स पॉवर



टाइप आर ए, हवेनें थंड होणारी
१७ हॉर्स पॉवर ते ६४ हॉर्स पॉवर







देशांत तयार होणाऱ्या, पुढील कितीतरी प्रकारच्या यंत्रसामुग्रीच्या बाबतींत हमखास शक्ति पुरवठ्याचें साधन म्हणून किर्लोस्कर एंजिनें विश्वासास पात्र ठरलीं आहेत — कॉंक्रीट मिक्सर्स, कॉम्प्रेसर्स, टार मिक्सर्स, रोड रोलर्स, पंप, क्रशर्स, जनरेटर्स इत्यादि.

सर्वश्रेष्ठ दर्जा आणि कितीहि खडतर परिस्थितींत कोणत्याहि खटपटीवांचून उत्तम कामगिरी या त्यांच्या गुणांमुळें यंत्रसामुग्रीचे अधिकाधिक कारखानदार हीं एंजिनेंच प्रथम पसंत करतात.

**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड.**

रजिस्टर्ड ऑफिस : एल्फिन्स्टन रोड, पुणें-३ (भारत)

अनुक्रमणिका










साहित्य कला संस्कृति: एप्रिल १९६४ : मूल्य १ रु.

## श्रेयनामावलि—






टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें हीं चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.




अनुक्रमणिका

दीपावली


## दलाल आर्ट स्टूडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# मित्रहो....

**गेल्या** महिन्यांतली गोष्ट ! हो-गेल्याच महिन्यांतली. दहा तारखेला एक हितचिंतक बोलतां बोलतां सहज म्हणाले- "हरिभाऊंची जन्मशताब्दि येते पुढच्या महिन्यांत कांहीं खास देणार ना ?" आम्हीं म्हटलें–"देऊं तर; पण हें खास म्हणजे काय ?" ते म्हणाले – "खास म्हणजे खास ! एकाच तऱ्हेचे, एकाच सांच्यांतून काढल्यासारखे अनेक लेख अनेक ठिकाणीं प्रसिद्ध होतील. तसलेंच तुम्हीं देऊं नका !" आम्ही म्हटलें – "मग काय देऊं सांगा !" तसे ते म्हणाले - "असं करा - महाराष्ट्र भाषा– भूषण ज. र. आजगांवकर यांनी लालित्यपूर्ण भाषेंत लिहिलेल्या व अजूनहि अप्रकाशित असलेल्या हरिभाऊंच्या आठवणी प्रा. न. र. फाटक यांच्याकडे आहेत. त्या कसंहिकरून मिळवा आणि त्यांचा उपयोग करा ! उगीच आपले सांच्यांतून काढलेले लेख नका देऊं !" बापरे ! म्हणजे हा फार मोठा द्राविडी प्राणायाम होता.... !

"अहो पण आजगांवकरांचं तें लिखाण मिळवायला उशीर लागेल तेव्हां...." आमचें म्हणणें अर्ध्यावरच तोडून ते म्हणाले "अहो–जन्मशताब्दि पुढच्या महिन्यांत आहे." त्यावर आम्हीं म्हटलें– "पण पुढच्या महिन्याच्या अंकाची याच महिन्यांत तयारी नको का ?" त्यावर ते हितचिंतक म्हणतात कसे - "तुमचा पुढच्या महिन्याचा अंक निघतो या महिन्याच्या एकोणीस तारखेला. शताब्दि पुढच्या म्हणजे एप्रिल महिन्यांत आहे. एवीतेवीं तुमचा 'मे'चा अंक एप्रिलच्या मध्यावरच निघणार त्या अंकांत तें साहित्य दिलें तरी हरकत नाही ! पण देणार तर तसलें कांहीं द्या बुवा !"

त्याच्या त्या बोलण्याचें आम्हांला हंसूं आलें. वाटलें खरेंच ते म्हणतात त्याच्यांत काय चुकीचें होतें. हरिभाऊंच्या काळीं अशीं पुढच्या महिन्याचीं मासिकें आदल्या महिन्याच्या पंधरा तारखेलाच बाजारांत येत होतीं का ? रविवारचीं साप्ताहिकें गुरुवारीं निघत होतीं का ? त्या त्या दिवशींचें साप्ताहिक त्या त्या दिवशींच निघायचें. मासिक म्हटलें कीं तें महिन्याच्या एक तारखेस निघायचें; कदाचित त्या महिन्याच्या आठ तारखेपर्यंतहि त्याचा पत्ता नसे. वाचक बिचारे डोळयांत प्राण आणून वाट पाहात असत, पण आतां पहावें तर 'पाहूं बरें कोण थकून जातो' अशी अहमहमिका लागलेली आहे. अंक कसा निघाला यापेक्षां अंक केव्हां निघाला हें आज महत्वाचें झालेलें आहे. या चढाओढीमुळें हळू हळू डिसेंबरच्या एक तारखेला जानेवारीचा अंक निघेल आणि जानेवारीच्या एक तारखेला फेब्रुवारीचा अंक निघेल. वार्षिकांचेंहि तसें व्हायला हरकत नाहीं. १९६४ च्या दिवाळीला निघणारें वार्षिक त्या वर्षाच्या मे-जूनच्या सुमारास काढावें म्हणजे चढाओढीची बास्ती नाहीं; पण एकानें असा प्रयोग केला म्हणून दुसरा थोडाच गप्प राहणार; तो मार्च-एप्रिल-मध्येंच दिवाळी अंक बाजारांत 'टाकील' आणि असें होतां होतां पुढचा ६५ सालचा दिवाळी खास अंक या दिवाळींतच येईल; व एक नवी प्रथा व्हायला वेळ लागायचा नाहीं. असो !

आमच्या हितचिंतकांच्या इच्छेप्रमाणें आम्हीं दीपावलीच्या मे महिन्याच्या – पण धंद्याच्या चढाओढीमुळें एप्रिलमध्येंच निघणाऱ्या अंकांत कै. हरिभाऊंच्या बद्दलचें एका सिद्ध हस्त लेखणीनें लिहिलेलें साहित्य हरिभाऊंच्या पुण्यस्मरणानिमित्त पुरवणी म्हणून देत आहोंत. प्रा. न. र. फाटक यांनी आमच्यावरील लोभामुळें तें प्रसिद्धिण्यासाठीं दिलें याबद्दल त्यांचे आभार मानतों. गेल्या महिन्यांत दीपावलीला जोडलेली क्रिकेट पुरवणी ही प्रत्यक्ष सामन्यापेक्षां चांगली होती असा अभिप्राय अनेक वाचकांकडून मिळाला. आम्हींच आमची पाठ थोपटून घेतली. मित्रहो, हरिभाऊंच्या पुरवणीच्या बाबतींत ठराविक ठेकेदारांचें साहित्य न देतां विचारपूर्वक केलेला हा प्रयत्न तुम्हां रसिक वाचकांना आवडेल अशी आशा व्यक्त करतों. साहित्य कसें वाटलें तें जरूर कळवा बरें का !

–संपादक




अनुक्रमणिका




## एक तांत्रिक प्रश्न

संपादक 'दीपावली'

सप्रेम नमस्कार,

आपल्या 'दीपावली' मासिकांत जीवनांत जें जें हृद्य, आकर्षक आणि संस्मरणीय आहे त्याचा रंग, रेखा आणि शब्द यांच्या द्वारा संयत, सुमधुर आणि सौंदर्यपूर्ण आविष्कार शक्यतो नुसार होत राहावा अशी अपेक्षा बाळगणारा मी एक वाचक आहे. परन्तु आपल्या फेब्रुवारी १९६४ च्या अंकांत श्री. अशोक शहाणे यांच्या साहित्यविषयक टीकेच्या संदर्भात जो मजकूर आला आहे तो खटकणारा आहे.

साहित्य विषयक विचार विमर्ष यांत एक मत असले पाहिजे असें कुणींच म्हणणार नाही. किंबहुना या क्षेत्रांतली मतभिन्नता जशी जीवंत पणाची खूण मानता येईल त्याच प्रमाणें तो साहित्याच्या विकासास पूरक ठरेल. पण मतभेद व्यक्त करण्याची शैली आणि शिस्त ही केवळ शिष्ट संमत असून भागणार नाही तर ती रसिक संमतहि असली पाहिजे. अनौचित्य पूर्ण टीकेचा डोळस समाचारहि औचित्याला सोडून असता कामा नये, साहित्य हे संस्कृतीचे प्रधान आणि अविभाज्य अंग असल्याने औचित्य हेहि अंगभूत समजले पाहिजे. दुसरें असें कीं साहित्याच्या वादांत साहित्यिकाची शरीर टीका–प्रतिटीका यांचे प्रदर्शन तर केव्हांहि अप्रस्तुतच होय. श्री. अशोक शहाणे यांची अमान्य मतें कुणीहि खोडावी पण त्या करता त्यांची शारीरिक पातळीवर विकृति निर्देशिणे निरोगीपणाचें लक्षण नव्हे. मराठीच्या दुर्दैवानें मराठींतील प्रा. गंगाधर गाडगीळांसारखी प्रथितयश साहित्यिक मंडळीपण या पातळी सोडून साहित्य चर्चेच्या रिंगण्यांत उतरण्याच्या मोहाला बळी पडलेली दिसतात. (पाहा: जानेवारी' ६४ चा 'वीणा' मासिकांतील प्रा. गाडगीळांचा 'आलोचना' मासिकांतील लेखावरील लेख) श्री. अशोक शहाण्यांच्या विचारांच्या बाबतींत आतांपर्यंत फक्त श्री. वसंत पळशीकर (पाहा सत्यकथा फेब्रुवारी ६४) यांनी या बाबतींत वस्तुनिष्ठ आणि सयुक्तिक भूमिका प्रकटपणे घेतलेली दिसते. साहित्याच्या क्षेत्रांत अशी भूमिकाच साहित्य संपर्क, साहित्य विचार आणि साहित्य जीवन गतिमान, प्रसन्न आणि प्रगतिपर ठेवूं शकते. आपले मासिक तर्शी परंपरा दृढ करण्यास हातभार लावणारे ठरावें एवढाच हा पत्र लिहिण्याचा एकमेव हेतु. हा आशय ध्यानांत आल्यास हा वादाचा विषय नाहीं हेहि निराळें स्पष्ट करण्याची आवश्यकता नाही.

आपला

**दा. गो. देशपांडे**

मुंबई.

## • व त्याचे उत्तर

दा. गो. देशपांडे यांचें पत्र वाचलें. दीपावलीं'तील 'पंढाचें' वाङ्मयीन प्रतिपादन' हा मजकूर त्यांना खटकला हें समजलें. त्यांना तो मजकूर कां खटकला हें सांगतांना त्यांनीं साहित्य विषयक टीकेचे दंडक कोणते असावेत तें पण मांडलें आहे. आतांपर्यंत जी पंढसंप्रदायावर टीका झाली तींत 'सत्यकथेतील टीका' देशपांडे सयुक्तिक व वस्तुनिष्ठ मानतात. तसें मानण्याची त्यांना मोकळीक आहेच. पण इतर टीका त्यांना कां खटकतात ? तर जें कांहीं त्यांच्या लिखाणांतून समजतें त्यावरून इतर टीकांतील अनौचित्य त्यांना खटकतें. दीपावलींतील मजकुरांत मनोहर मासिकांत ज्यांचा प्रबंध प्रसिद्ध झाला आहे त्यांच्या शारीरिक बाबीविषयी टीका झाली आहे असें त्यांचें म्हणणे. देशपांडे महाशयांनी पुनः एकदां दीपावलींतील मजकूर नीट वाचावा, म्हणजे त्यांना कळेल कीं, कीडकी, नासकी विकृत शरीरयष्टी इ. शब्दप्रयोग कुणा एका व्यक्तीला उद्देशून नसून एका विशिष्ट संप्रदायी पिढीला (समवृत्तीच्या) अनुलक्षून आहे. (पाहा: अमेरिकन व युरोपीय साहित्यांत आजवर प्रसिद्ध झालेली 'बीट' पिढीची संपूर्ण माहिती . . . ) जो विषयच असा आहे कीं जेथें औचित्याच्या मर्यादा बेधडक उधळून दिल्या जातात व अमर्यादा अनौचित्य नागडें उघडें थैमान घालतें, तेथें कसें वागावें व संयमाला सयुक्तिकतेची किती मुरड घालावी हें ज्याच्या त्याच्या मूलगामी प्रकृतीवर अवलंबून असतें; आणि हें सारें साबीत असतांनाहि 'दीपावली'तील मजकूर अनौचित्यपूर्ण लिहिला गेला आहे असें मुळीच नाहीं. अमूकच एका टीकासंप्रदायाचा दंडक मानलाच पाहिजे असें कुणी, किती ठरवायचें हा मुद्दा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. पण शिष्टता व सभ्यता यांना अगदीच हरताळ फासला जात आहे असें वाटलें तर हडसून खडसून विचारणें अनुचित कसें ?

–सारस्वत

### अश्लील मासिकांचा वाचक



# आजगांवकर कृत हरिभाऊंचा स्मृति गौरव

कै. महाराष्ट्र भाषा भूषण जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांना सुप्रसिद्ध कादंबरीकार कै. हरि नारायण आपटे यांच्या निकट सहवासांत सतत कांहीं वर्षें राहण्याचा योग आल्यामुळें व आपटयांचा प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें आजगांवकरावर उपकार घडलेला असल्यामुळें आजगांवकरांनीं हरिभाऊंच्या चरित्रपर माहितीचें व सहवासांतील स्वानुभवाच्या आठवणींचें एक बाड इ. स. १९३२ सालीं लिहून पुरें केलें होतें. तें बाड पुस्तक रूपानें छापलें जावें, अशा हेतूनें आजगांवकरांनीं ह्या बाडांतील विषयांची अनुक्रमणिका, प्रस्तावना ही सुद्धां त्यास जोडून ठेवली होती. आजगांवकरांनीं तें पुस्तक छापलें जावें म्हणून स्वतंत्रपणें प्रयत्न केला असावा; परंतु त्यास यश आलें नाहीं तेव्हां त्याची कांहींतरी योग्य व्यवस्था व्हावी म्हणून त्यांनीं मृत्यूपूर्वी चार पांच वर्षें तें बाड न. र. फाटक यांच्या स्वाधीन केलें. फाटकांनीं एक दोन प्रकाशकांकडे त्याबद्दल खटपट केली, तीहि वाया गेली. तरी हें बाड आजगांवकरांनीं त्यांच्याकडेच ठेवले. यंदा कै. आपटयांची जन्मशताब्दीचा समारंभ सुरू झाला आणि आपटयांच्या माहितीचा अंक प्रसिद्ध करण्यासाठीं सामग्री जमवीत असतां या बाडाचा उपयोग करण्याचें ठरलें व त्याप्रमाणें आजगांवकरांनीं लिहून ठेवलेल्या आठवणी लिहिल्यापासून बत्तीस वर्षांनीं जगापुढें येत आहेत. फाटकांनीं ही आपल्याजवळची ठेव आम्हांस कसलेहि आढेवेढे न घेतां दिल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों. आजगांवकरांच्या आठवणींतील पुनरुक्ति, विसंगति वगैरे दोष काढून टाकून त्या विषयवार लावण्याचें काम श्री. फाटकांनीं केलेले आहे. या आठवणींतील वर्तमानकालवाचक प्रयोग लेखन आजगांवकरांच्या हयातींतले असल्यामुळें वाचकांना भ्रमांत टाकणार नाहींत अशीं आशा आहे.

—संपादक

## हरिभाऊंशीं माझी ओळख कशी झाली ?

महाराष्ट्र वाङमयमंदिराच्या कादंवरी विभागाचे सम्राट कै. हरि नारायण आपटे यांची प्रस्तुत लेखकाशी पहिल्याने ओळख कशी झाली आणि पुढें दाट परिचयांत किंबहुना निकट स्नेहसंबंधांत तिचें पर्यवसान कसे झालें ती हकीकत मोठी मनोरंजक आहे.

सुमारे ५० वर्षापूर्वीची गोष्ट. मी कोंकणांत सावंतवाडी संस्थानांतील आजगांव गांवीं मराठी पांचव्या इयत्तेंत होतों. त्यावेळीं शाळेंतल्या एका मुलानें 'आजकालच्या गोष्टीमधली स्थिति' ह्या हरिभाऊंच्या पहिल्या कादंबरीचे दोन्ही भाग कोठून आणले होते तें मी वाचलें. त्यापूर्वी सिंहासन बत्तिशी, वेताळ पंचविशी, लटकचाळिशी, विचित्रपुरी, मंजुघोष वगैरे जुन्या पद्धतिच्या अद्भूतरम्य कथा माझ्या वाचनांत आल्या होत्या. त्या सर्वांहून अगदीच निराळ्या तऱ्हेची व जिच्यांतील कथानक प्रत्यक्ष घडलेलें आहे असें वाटावें अशा प्रकारची हरिभाऊंची ही पहिलीच कादंबरी वाचून तिच्या लेखकाविषयीं मला मोठें कौतुक वाटलें. पण माझ्या भावी आयुष्यांत या उदयोन्मुख कादंबरीकाराचा व माझा निकट संबंध येऊन त्याच्या स्नेहाचा अपूर्व व दुर्मिळ लाभ मला होणार आहे अशी कल्पना त्यावेळीं माझ्या स्वप्नांतहि आली नाही. व येणें शक्यहि नव्हते.

इ. स. १८९९ त मी आजगांवाहून मुंबईस आलो. त्यावेळीं व्याख्यानें ऐकण्याची मला फार आवड. म्हणून व्याख्यान श्रवणाची संधि आल्यास मी ती सहसा दवडीत नाही. पुण्यांतल्या वसंत व्याख्यानमालेप्रमाणें मुंबईत त्यावेळीं हेमंत व्याख्यानमाला होती. त्या मालेंत एकावर्षीं हरिभाऊंचे 'कादंबरी' या विषयावर एक मोठें मार्मिक, व माहितीनें भरलेलें व्याख्यान झाले. या व्याख्यानास मी हजर होतो. मुंबईत प्रार्थनासमाजाजवळ हल्लीं 'जी' कापडाची दुकानें आहेत त्यांच्या मागच्या बाजूच्या वखळींत हें व्याख्यान झाले. रा. ब. महाजनि अध्यक्ष होते. यावेळीं हरिभाऊंस मी प्रथमच पाहिलें. त्यापूर्वी त्यांच्या लोकप्रिय 'करमणूक' पत्राच्या द्वारे त्यांच्या लेखनकौशल्याचा लाभ मी घेतच होतो. त्यावेळीं 'भयंकर दिव्य' ही कादंबरी 'करमणूकींत' सुरू होती. व दर अंकांत प्रसिद्ध होणारें तिचें प्रकरण मी मोठ्या अधाशीपणानें वाचीत असें. हरिभाऊंनीं आपल्या व्याख्यानांत 'कादंबरी'ची व्याख्या सांगून पुष्कळ इंग्रज फ्रेंच कादंबरीकार व त्यांच्या कादंबऱ्या यांची माहिती सांगितली. त्यांतहि 'झोला' नामक फ्रेंच कादंबरीकाराचा उल्लेख त्यांनी अनेक वेळा केला. हरिभाऊंचें व्याख्यान संपल्यावर त्यावेळीं नुकतेच एम. ए. झालेलें आणि हल्ली सेवानिवृत्त होऊन पुण्यांत जाऊन राहिलेले प्रो. साठे यांचे थोडेसे भाषण झालें व नंतर अध्यक्ष या नात्यानें रा. ब. महाजनि यांनी समारोप केला. त्यांत त्यांनी हरिभाऊंची पुष्कळच स्तुति केली.

या वेळीं हरिभाऊंचा जो पोषाक मी पाहिला तोंच शेवटपर्यंत कायम होता. त्यांत त्यांनी कधी बदल केला नाही. गुळगुळीत हजामत, आडवें गंध, डोक्यास काळा जरीकाठी रुमाल, आणि अंगांत फारशी पद्धतीचा कोट हा त्यांचा अगदी ठराविक पोषाक होता. एक मोठा सुती जरीकांठी रुमाल घेऊन त्याचे दोन रुमाल करावयाचे आणि त्यांतला एक वापरावयास काढून दुसरा विशेष



अनुक्रमणिका




प्रसंगी वांचण्यासाठीं ठेवून ध्यावयाचा. त्याच्या मोठ्या डोक्याम हा अर्वा रुमाल जरा लहानच दिसत असे. बुटांचा एक जोड घेऊन ठेवलेला असे. परंतु त्याचा उपयोग मात्र 'लेव्ही' वगैरेसारख्या समारंभास जातानाच ते करीत असत.

आरंभी आरंभी "करमणूकी'च्या बाबतीत हरिभाऊंस मजकडून फारशी मदत झाली नाही. व त्यांनीहि मागितली नाही. 'चित्रमम जगत' या लोकप्रिय मासिकाचा जन्म या सुमारास झाला. श्री. वासुकाका जोशी यांनी मासिकाची कल्पना हरिभाऊंस सांगितली व चित्रशाळेचें पूर्वी प्रसिद्ध केलेल्या 'चित्रमय वर्मा'; 'चित्रमय जापान' वगैरे पुस्तकाच्या नांवाप्रमाणें मासिकाचें नांव 'चित्रमय-जगत्' ठेवावें असें ठरलें. 'चित्रमय जगत्'चा मी पहिला संपादक म्हणून श्री. वासुकाका जोशी हे आरंभापासून सदर मासिकाचे अंक आजतागायत मजकडे नियमाने पाठवित आहेत. मासिकाच्या पहिल्या अंकांतला बराच मजकूर माझ्या हातचा आहे. हरिभाऊंच्या एका कादंबरीचेहि परीक्षण मी केलेलें आहे. हरिभाऊंनीहि 'शेक्स-पीयर' विषयीं कांहीं लेख सदर मासिकांत लिहिले आहेत.

'करमणूकी' साठीं लिहावयाचा मजकूर हरिभाऊ बहुधा पहांटे उठून लिहीत असत. केव्हां केव्हां एकाच बैठकींत चालू कादंबरीची दोन तीन प्रकरणें लिहून टाकायची, तर पुढें कित्येक आठवडे त्या कादंबरीची एक ओळहि लिहावयाची नाही ! आणि पुनः केव्हा लिहिण्याची लहर लागेल तेव्हा मागली प्रकरणें वाचून न पाहतांच पुढील लेखन सुरु करावयाचें. त्यांच्या कादंबऱ्यांत कांहीं ठिकाणीं थोडीशी द्विरुक्ति आढळते याचें कारण हेंच होय. 'सूर्योदय' कादंबरीत अफजलखानाचा वकील गोपीनाथ पंत यांचें नांव आरं-भीच्या कांहीं प्रकरणांत 'पंताजी पंत' असें दिलें होतें. या आपल्या विस्मरणशीलतेची जाणीव हरिभाऊंस होती. कारण, 'सूर्योदय' व रुप नगरची राजकन्या' या आपल्या दोन कादंबऱ्या जेव्हां त्यांनी पुस्तकरूपानें छापण्यास दिल्या तेव्हां त्यांतील वरील प्रकारचे दोष काढून टाकण्याची कामगिरी मजकडे सोपविली होती.) कादंबरीचें प्रकरण लिहून झालें म्हणजे मी आनंदाश्रमांत जातांच ते मला वाचावयास देत व नंतर छापखान्यांत पाठवीत. पुढें पुढें लिहिण्याचा त्यांना कंटाळा येऊं लागला. 'माझी प्रतिमा' आतां कमी होत चालली आहे, परंतु माझ्या हातचे कादंबरीचें प्रकरण नसलें तर 'करमणूक' चालणार नाहीं म्हणून मला कादंबरी लिहिणें भाग पडते ! असें त्यांनीं मला एकदां बोलून दाखविलें होतें.

पुढें पुढें 'करमणूक' पत्रासाठीं मजकूर लिहिण्याचा हरिभाऊंस अगदींच कंटाळा आला. 'कादंबरीच्या प्रकरणाऐवजी माझ्या कवि-चरित्राच्या दुसऱ्या व तिसऱ्या भागांतील कवींचीं चरित्रें ते 'करम-णुकींत' प्रसिद्ध करूं लागले. कविचरित्राचे हे दोन भाग त्यावेळीं लिहून तयार झालेले होते. आर्यभूषण छापखान्यांतला मनुष्य मजकूर मागण्यास आला कीं हरिभाऊंनीं पत्र देवून आपला भय्या मजकडे पाठवावा व मी एकऐका कवीचे चरित्र त्याजबरोबर पाठवावें. असा क्रम सुमारें एक वर्षभर चालला होता. यामुळें, कविचरित्राच्या दुसऱ्या व तिसऱ्या भागांतील बरीच कविचरित्रें 'करमणूकी'त अगो-



दरच प्रसिद्ध होऊन गेलीं. व पुढें जेव्हा सदर दोन्ही 'भाग' स्वतंत्र पुस्तकरूपानें छापण्याचा प्रसंग आला तेव्हां 'करमणुकी'च्या अंकांतील 'कटिंगें' काढून कंपोजला द्यावी लागली.

हरिभाऊंचा स्वभाव अत्यंत विनोदी आणि मनमिळाऊ होता. हरिभाऊ सरकारी अधिकाऱ्यांकडे खेटे घालतात आणि त्यांच्या कानांशीं लागतात वगैरे ज्या गोष्टी ऐकू येत असत त्या निव्वळ गप्पा होत्या. कलेक्टरनें किंवा एखाद्या अधिकाऱ्यानें आपण होऊन बोलावलें किंवा म्युनिसिपालिटीचें एखादें महत्वाचें काम असलें तर हरिभाऊ सदर अधिकाऱ्याकडे जात असत, व अधिकारी लोकां-पाशी त्यांचें मोठें वजन होतें ही गोष्ट खरी आहे. परंतु अधिकाऱ्यांशीं लांगुलचालन करून आपल्या प्रतिपक्षीयांस गोत्यांत आणण्याइतकें स्वाभिमानशून्य आणि हलक्या मनाचें हरिभाऊ नव्हते, हें मी प्रज्ञेवर सांगू शकेन.

मध्य परंतु कांहींशी ठेंगू शरीरयष्टि, मस्तकावर गोष्पदप्रमाण शिखा, निटिलावर पांढरे आडवें गंध, अगदीं साधा पोषाक आणि गांभीर्य व स्मित यांनी युक्त असें रुबाबदार मुखमंडल अशी ती हरिभाऊंची रम्य मूर्ति या घटकेस माझ्या मनःचक्षुपुढें उभी आहे. नानासाहेबांच्या अंत्यविधीच्या वेळीं त्यांना मिशा काढाव्या लागल्या. तेव्हापासून पुढें ते नेहमींच मिशा काढीत असत. सभेंतील भाषणांत आणि ग्रंथांतील लेखनांत अतिशय गांभीर्य दाखविणारे हरिभाऊ खाजगी संभाषणांत भयंकर विनोदी होते, किंबहुना विनोदीपणा हे

अनुक्रमणिका

## हरिभाऊ जातो आतां....

गोपाळराव गोखले वारले त्या सकाळीं मी त्यांच्याजवळ होतो. संध्याकाळीं घरीं परत आलों. जरा बसतों तों रात्रौं दहा वाजतां सोसायटींतून निरोप आला कीं गोखले अत्यवस्थ आहेत. सोसायटींत येऊन पाहतो तर गोपाळराव आरामखुर्चीवर पडले असून शेवटल्या स्थितींत आहेत आणि सर्व मंडळी सभोंवार उभी आहे. मी जवळ जातांच त्यांनी डोळे उघडले. व माझ्याकडे पाहून 'हरिभाऊ, जातों आतां . . ' असें हंसून म्हणून नमस्कार केला. लागलीच मान टाकली. आणि सर्वच आटोपलें. जणूं काय माझा निरोप घेण्यासाठींच ते वाट पहात होते" . . . हो शेवटची वाक्यें बोलत असतां त्यांचा कंठ दाटून आला. मग दीर्घ निःश्वास सोडून ते म्हणाले....

I lost two of my dear persons yesterday. I thought I woud be the third to follow them!.....

त्यांचें एक स्वभाववैशिष्ठ्यच होतें असें म्हटल्यास चालेल.

एखादा अपरिचित मनुष्य त्यावेळीं आनंदाश्रमांत गेला असता आणि त्याला हरिभाऊ कोणते हें समजून घ्यायचे असते तर, आनंदाश्रमाच्या पहिल्याच मजल्यावरील दिवाणखान्यास लागून असलेल्या खोलींत समोंवतालीं इंग्रजी, मराठी, संस्कृत, फ्रेंच, जर्मन वगैरे अनेक भाषांतील शेंपन्नास पुस्तकें अस्ताव्यस्त रीतीनें पसरलीं आहेत, एखादी पोथी उलगडून तिची पानें वाऱ्यावर सोडलेलीं आहेत, वर्तमानपत्रांचा व मासिकांचा ढीग एका बाजूस उभा आहे, कांहीं अर्धवट लिहिलेलें कागद जवळच पडले आहेत, अशा थाटांत बहुत करून उघडे बोडके बसलेले जे गृहस्थ आढळले असते. तेच हरिभाऊ आपटे असे त्याने खुशाल समजावयास हरकत नव्हती.

त्यांच्या बैठकीचा प्रकारहि असाच विचित्र असे. आज जर ते पूर्वेकडे तोंड करून लिहावयास बसले तर उद्या त्यांचें तोंड पश्चिमेकडे असावयाचें हे अगदीं ठरल्यासारखें होतें. दिशा बदलल्यानें लिहावयास चांगलें सुचतें असें ते म्हणत.

### निर्णय बदलला

स्वतःच्या 'करमणुकीं' शिवाय स्वतःची कादंबरी किंवा गोष्ट, दुसऱ्या कोणत्याहि नियतकालिकांत, होता होईल तो द्यावयाची नाहीं असा हरिभाऊंचा निश्चयच होता. 'मासिक मनोरंजन' चे संपादक कै. काशीनाथपंत मित्र ह्यांनी, हरिभाऊंनी आपल्या मासिकांत कांहीं तरी लिहावें म्हणून आनंदाश्रमांत कितीतरी खेपा घातल्या परंतु त्यांची इच्छा कांहीं सफल झाली नाही. पण पुढें एकदां, मी मुंबईस येण्यास निघालों असतां हरिभाऊ मला म्हणाले, "काशीनाथपंताची गांठ पडली तर त्यांना सांगा कीं मी तुमच्या मासिकासाठीं एक कादंवरी लिहिण्यास तयार आहे. पण प्रत्येक पृष्ठास अमूक रुपये या दरानें पैसे द्यावे लागतील." मी मुंबईस गेल्यावर कै. मित्र यांस भेटलों, पण कादंबरीचा विषय कांहीं मी त्यांजकडे काढला नाहीं. कारण हरिभाऊंचा विचार मागाहून कदाचित बदलेल अशी मला शंका होती. व तीच शेवटी खरी ठरली. कारण, मी पुण्यास परत गेल्यावर, हरिभाऊंनी मला पहिला प्रश्न विचारला तो हा," काशीनाथ पंताची गांठ पडली होती काय ?" मी म्हटलें," होय. मी त्यांना भेटलों, पण तुमचा निरोप कांही मी त्यांना सांगितला नाही." तेव्हा हरिभाऊ खुष होऊन म्हणाले, "बरें केलेंत. मी त्यावेळीं तुमच्यापाशीं बोलून गेलो खरा, पण मागाहून तो माझा विचार बदलला."

### हरिभाऊंचें खरे परिश्रम

आपल्या कादंबऱ्या शक्य तितक्या सजवून त्यांतली वर्णनें कथानकाच्या कालास अनुरूप अशीं उतरावीं एतदर्थ हरिभाऊ किती परिश्रम घेत असत याचे एकच उदाहरण येथें देतो. 'रूपनगरची राजकन्या' ही सुंदर ऐतिहासिक कादंबरी हरिभाऊ लिहित होते. या कादंबरीतील नायिकेनें नायकास एक पत्र लिहिलें आहे. हे पत्र तयार करण्यासाठीं, मारवाडी भाषेंतलीं कांहीं पद्यात्मक पुस्तकें हरिभाऊंनी चाळली. शेवटीं, रुक्मिणी स्वयंवराच्या कथेवर 'रुक्मिणी मंगल' या नांवाचे मारवाडी भाषेतलें एक काव्य त्यांना सांपडलें व त्यांतील, रुक्मिणीनें कृष्णास पाठविलेल्या पत्रिकेंतील पद्यांत थोडासा फेरफार करून ती पद्यें त्यांनीं, नायिकेचें पत्र तयार करण्याचें कामीं उपयोगांत आणली.

'पण लक्षांत कोण घेतो' ही हरिभाऊंची अत्यंत लोकप्रिय कादंबरी लिहिण्याची कल्पना त्यांना कशावरून सुचली याविषयीं कांहीं लेखकांनी जी माहिती दिली आहे ती खुद्द हरिभाऊंनी मला सांगितलेल्या माहितीशीं जुळत नाही. हरिभाऊंस मी यासंबंधाने एकदां विचारलें असतां त्यांनीं असें सांगितलें की, "एकदां एक गृहस्थ व त्यांची बायको आपल्या बालविधवा सुनेस घेऊन आनंदाश्रमांत येऊन उतरली. सुनेचें केशवपन करण्यासाठीं तिला ती दुसरें दिवशी एका तीर्थाच्या ठिकाणीं घेऊन जाणार होती. भावी प्रसंगाच्या भीतिनें ती मुलगी इतकी घाबरून गेली होती कीं ती रात्रभर सारखी रडत होती. हा प्रसंग माझ्या डोळ्यासमोर एकसारखा उभा राहू लागला व त्यामुळें 'पण लक्षांत कोण घेतो' ही कादंवरी लिहिण्याची स्फूर्ति मला झाली."

### धार्मिक वर्तन

एकें दिवशीं, मी माझ्या ऑफिसांत—रे इंडस्ट्रियल म्युझियम मध्यें असतां, दुपारी दोन-तीन वाजतां आनंदाश्रमांतला भय्या रामसिंग हा मजकडे आला आणि म्हणाला, "तात्यासाहेबांनी तुम्हास बोलावलें आहे." लागलीच म्युझियम बंद करून मी आनंदाश्रमांत गेलो, तों तेथें एक मोठी दोन घोड्यांची गाडी व जवळच हरिभाऊंची स्वारी कपडे करून उभी असल्याचें दिसलें. "मला कां बोलावलें?"








असें मी विचारतांच हरिभाऊ म्हणाले, "चला गाडीत जाऊन बसा. आज मी भांबुर्ड्याच्या शाळेची तपासणी करण्यास जात आहे. आणि वाटेंत गप्पा मारण्यास कोणी नाही, म्हणून तुम्हास बोलावलें."

आम्ही दोघेहि गाडीत बसून लकडीपुलाच्या वाटेने भांबुर्ड्यास जाण्यास निघालों. वाटेंत नाना प्रकारच्या गप्पा चालूच होत्या. शेवटीं, भांबुर्ड्याजवळ एक लेणें आहे तेथें हरिभाऊंनी गाडी उभी करविली. आम्ही दोघेहि खाली उतरल्यावर त्यांनी मला विचारलें, "येथें लेणें आहे तें तुम्ही कधीं पाहिलें आहे काय?" मी म्हटलें, "नाही." कारण, पुण्याच्या जवळपास एखादें लेणें असेल अशी मला कल्पनाहि नव्हती. हरिभाऊ म्हणाले, "चला तर मग, मी तुम्हाला लेणें दाखवितों." इतकें बोलून त्यांनी मला जमिनीच्या पृष्ठभागाखाली असलेल्या एका लेण्यांत नेलें. हें लेणें म्हणजे खडकांत कोरलेलें श्रीशंकराचें एक देवालय असून त्यांत गुडुप अंधार होता. आंत प्रवेश करतांच हरिभाऊंनी खिशांतून एक पैसा काढून देवापुढें ठेवला. व मलाहि ठेवण्यास सांगितलें. परंतु मजपाशी पैसा नव्हता म्हणून माझ्यासाठीं आणखी एक पैसा त्यांनी देवापुढें ठेवला आणि कांहीं लोक शिवदर्शनाचे वेळीं, नाकाशी बोट धरून डमरूच्या आवाजासारखा किंवा शंखनादासारखा जो एक प्रकारचा आवाज काढतात, तसला आवाज काढला. नंतर प्रदक्षिणेस सुरवात झाली. देवास आम्ही तीन प्रदक्षिणा घातल्या प्रदक्षिणेच्या वाटेंत गडद अंधार होता. म्हणून उहरिभाऊंनी माझी काड्यांची पेटी मागून घेतली. त्यांनी एकेक काडी ओढावी आणि तिच्या प्रकाशांत एकएक पाऊल टाकावें, असें करतां करतां, तीन प्रदक्षिणा एकदाच्या पुऱ्या झाल्या व माझी अर्धी पेटी खलास झाली, त्या वेळीं हरिभाऊंचें जें एकंदर वर्तन मी पाहिलें, त्यांत ढोंगीपणाचें कोणतेच चिन्ह मला दिसलें नाहीं.

### हरिभाऊंचा ग्रंथसंग्रह

हरिभाऊंची लायब्ररी बरीच मोठी होती व आपल्या लायब्ररीसाठीं पुस्तकें खरेदी करण्यांत त्यांनी बराच पैसा खर्च केला होता. परंतु आज मुद्दाम पांच पन्नास रुपये खर्चून खरेदी केलेलीं पुस्तकें आणखी चार महिन्यांनी त्या लायब्ररींत सांपडलीच असती, अशी मात्र कोणीहि कल्पना करूं नये. चार दिवसापूर्वी विकत घेतलेलें पुस्तक कोठें ठेवले याची आठवण न राहिल्यामुळें तेंच पुस्तक पुनः विकत घ्यावें लागे व त्यामुळें एकाच पुस्तकाच्या चारपांच प्रति हरिभाऊंच्या लायब्ररींत सहज सांपडावयाच्या. शेक्सपियर, ब्रौनिंग, मूर, शेले, पोप, स्कॉट, मेटरलिंक, डिकन्स, थॅकरे, रेनॉल्ड, हेन्‌री उड, जॉर्ज इलियट, मेकाले, रस्किन इत्यादि बहुतेक सर्व नामांकित आंग्ल ग्रंथकारांच्या सर्व ग्रंथांच्या निरनिराळ्या आवृत्त्या हरिभाऊंच्या संग्रही होत्या. शिवाय संस्कृत, मराठी, फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश बंगाली ,हिंदी, गुजराती, वगैरे शेंकडो भाषांतरे, शेंकडो पुस्तकें होतीं तीं निराळी! हरिभाऊंसारखा अनेक भाषाकोविद पुरुष महाराष्ट्रांत दुसरा क्वचितच झाला असेल.

हरिभाऊंचा हा ग्रंथसंग्रह इतका अव्यवस्थित होता कीं त्यांच्या एकंदर अव्यवस्थितपणास शोभण्यासारखाच होता, असें म्हटल्यास चालेल. बंगाली पुस्तकांच्या शेजारी कांहीं जर्मन पुस्तकें, इंग्रजी आणि फ्रेंच पुस्तकांची खिचडी झालेली. फार मोठ्या आकाराच्या इंग्रजी पुस्तकांशेजारी अगदीं चिमुकलें मराठी पुस्तक, अशी हरिभाऊंच्या ग्रंथ संग्रहालयाची पुष्कळ वेळां स्थिति असे. त्यामुळें जरूरीच्या वेळीं कोणतेहि पुस्तक चटकन हातीं येण्यास मोठी अडचण पडे व तें पुस्तक शोधून काढण्यास वेळ मोडावा त्यापेक्षा नवीन पुस्तक विकत आणलेलें बरें असें म्हणून हरिभाऊ टांगा जोडून कँपांत जात आणि तेथील एका ठराविक बुकसेलरच्या दुकानांतून ते पुस्तक व आणखी कांहीं नवीन पुस्तकें विकत आणीत.

### माझे प्रिय मित्र



**१८८३ साली प्रवेश परीक्षा उत्तीर्ण होऊन हरिभाऊ डेक्कन कॉलेजांत गेले. डॉ. भांडारकर विद्यार्थ्यांना शाकुंतल शिकवीत. एकदा हरिभाऊंनी शाकुंतलाच्या पांचव्या अंकांत एक वेगळा अर्थ सुचविला. पण त्याक्षणीं डॉ. भांडारकरांना तो अर्थ पसंत पडला नाही. पण दुसऱ्या दिवशीं वर्गांत तोच अर्थ त्यांनी मान्य केला. तेव्हांपासून डॉक्टर साहेबांचें त्यांच्यावर नितांत प्रेम बसलें हरिभाऊंना पत्र लिहितांना डॉ भांडारकर त्यांचा 'माझे प्रिय मित्र' असा उल्लेख निरंतर करीत.**

### अस्ताव्यस्त हरिभाऊ

एकें दिवशी मी म्युझियममध्यें बसलों असतां, रामसिंग (हरिभाऊंचा भय्या) मजकडे आला आणि "कांहीं जरूरीच्या कामासाठीं तात्यासाहेबांनी तुम्हांस आत्तांच बोलावले आहे" असें त्याने मला सांगितलें. मी लागलीच उठून आनंदाश्रमांत गेलो. हरिभाऊ माझी वाटच पाहात होते. मी तेथें जातांच ते मला म्हणाले, "आजगांवकर, एका अत्यंत अव्यवस्थित मनुष्याची एक लहानशी लायब्ररी आहे; तींत सुमारें दोन अडीच हजार पुस्तकें असतील. ही लायब्ररी व्यवस्थितपणें लावून देण्यास तुम्ही काय घ्याल?" मी म्हटलें, "लायब्ररीचा मालक कोण हे मला समजलें, म्हणजे देण्याघेण्याविषयी बोलतां येईल." त्यावर हरिभाऊ म्हणाले, "लायब्ररीचा मालक मीच आहे असे समजा." यावर मी सांगितलें कीं, तुमची लायब्ररी व्यवस्थितपणें लावून देण्यास मी तयार आहे व त्याबद्दल तुमच्याकडून कोणताहि मोबदला घेण्याची इच्छा नाही. हरिभाऊ म्हणाले "असें म्हणून चालणार नाही. लायब्ररी लावण्यास दिवशी दोन तास या प्रमाणें एक महिना तरी सहज लागेल. तेव्हा एवढ्या श्रमाचा कांहीं तरी मोबदला तुम्हांस मिळालाच पाहिजे." मी म्हणालों,

अनुक्रमणिका

"ठीक आहे. तुमचा आग्रह असेलच तर मोबदला घेण्यास मी तयार आहे. पण मला तुमचे पैसे नकोत, तर तुमच्या लायब्ररींत ज्या पुस्तकांच्या दोहोंहून अधिक प्रति सांपडतील त्या पुस्तकांची एकेक प्रत तुम्ही मला द्या म्हणजे झाले." विस्मरणशील हरिभाऊंची अशीं खात्री होती कीं, ज्या पुस्तकांच्या दोहोंहून अधिक प्रती आहेत अशी पुस्तकें आपल्या- लायब्ररींत पांच दहाहून अधिक सांपडणार नाहींत. यामुळें माझी वरील मागणी तत्काळ कबूल केली व माझ्या या अल्पसंतुष्टपणाबद्दल मनांत त्यांना थोडेसे आश्चर्य आश्चर्यहि वाटले असेल. पुढें सुमारे एक महिन्यांत, लायब्ररीतील सर्व पुस्तकें मी व्यवस्थितपणें, विषयवारीनें लावली व त्यांची यादी करून हरिभाऊंस दाखविली. त्यांनी स्वतः वर जाऊन लायब्ररी कशी काय लावली आहे, हे आपल्या मतें मोठ्या कसोशीने पाहिलें; व परीक्षा पाहण्यासाठीं मला अगदीच अपरिचित अशी चारपांच पुस्तकें काढून देण्यास सांगितलें. सगळीं पुस्तकें माझ्या डोळ्यासमोर असल्यामुळें, त्यांनी मागितलेली पुस्तकें काढून देण्यास मला बिलकुल विलंब लागला नाहीं. मी कसोशीने काम केलें आहे अशी खात्री झाल्यावर त्यांनी तसें बोलूनहि दाखविले. खाली उतरतांना, माझी कुचेष्टा करण्याच्या उद्देशानें ते मला म्हणाले, "महाराज, दोहोंपेक्षा अधिक जी काय शे दोनशें पुस्तकें मिळाली असतील ती खाली घेऊन या. कारण तीं आतां तुमच्या मालकीची आहेत." "ठीक आहे" असें म्हणून थोड्याच वेळांत सुमारे १५० पुस्तकें मी त्यांजपुढें नेऊन ठेवली. ही सगळी इंग्रजी, मराठी व संस्कृत पुस्तकें असून इतिहास, कविता व कादंबरी या विषयांवरील इंग्रजी पुस्तकांचा भरणा त्यांत मोठा होता. ती इतकी पुस्तकें पाहून हरिभाऊ अगदी आश्चर्यचकित झाले व "ही सगळीं पुस्तकें तुम्ही आतां घेऊन जाणार कीं काय?" असें थोड्याशा चिंता व्यंजक स्वराने त्यांनी मला विचारलें. त्यांची ती चर्या पाहून मला हंसू आल्याशिवाय राहिले नाहीं. परंतु माझें हास्य आंवरून मी त्यांस म्हटलें, "हरिभाऊ, यांतली बहुतेक मराठी पुस्तकें मजपाशीं आहेत; व मला संस्कृत फारसे येत नाही. राहतां राहिली इंग्रजी पुस्तकें, त्यांतली फक्त दहाबारा पुस्तकें माझ्या उपयोगाची आहेत. तेवढी मला द्या म्हणजे झालें." हे माझे भाषण ऐकून हरिभाऊंची मोठीच काळजी दूर झाल्यासारखें दिसले. त्यांनी मोठ्या खुशीने तीं दहाबारा पुस्तकें मला दिलीं.

त्यानंतर कांहीं दिवसांनी मी एकदां हरिभाऊंच्या लायब्ररीत मुद्दाम जाऊन पाहिले तो, माझे सगळे श्रम फुकट गेलेले असून पूर्वीप्रमाणें निरनिराळ्या भाषांतली व निरनिराळ्या विषयांवरील पुस्तकांची विलक्षण 'मिसळ' हरिभाऊंनी करून ठेवली आहे, असे माझ्या दृष्टीपत्तीस आले.

### विनोदी चुटके

जुन्या मराठी कवितेंचे हरिभाऊंचें वाचन मोठें होतें हें मी पूर्वी सांगितलेच आहे. व 'मराठी वाङ्मयाचा अभ्यास' पुस्तकावरूनहि ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. त्या पुस्तकांत प्रमुख मराठी कवींच्या योग्यायोग्यतेचे त्यांनी मार्मिक विवेचन केलें आहे. त्यांतल्या त्यांत ज्ञानेश्वरी आणि तुकाराम बुवांचें अभंग यांचे अध्ययन विशेष होते. ज्ञानेश्वरीचा त्यांनी फार सूक्ष्म अभ्यास केला होता. व ज्ञानेश्वरीतील सर्व शब्दांचा एक प्रचंड कोश तयार करण्याचा उद्योग त्यांनी कित्येक वर्षें चालविला होता. ज्ञानेश्वरींत- कांहीं थोड्या ओव्या अशा आहेत कीं, ज्यांचा चांगलासा अर्थ लागत नाहीं. उदाहरणार्थ "रत्नपारखियांच्या गांवी जाईल गंडकी तरी सोडावी" ही ओवी. त्याचप्रमाणें 'काश्मीर' हा शब्द ज्ञानेश्वरींत तीन ठिकाणीं निरनिराळ्या तीन अर्थांनी आलेला आहे. एकदां अशी मौज झाली कीं, ज्ञानेश्वरीचे अभ्यासक बडोद्याचे डॉ. चिपळूणकर हे वसंत व्याख्यानमालेंत व्याख्यान देण्यासाठी पुण्यांत आले असतां एके दिवशीं हरिभाऊंची भेट घेण्यासाठीं आनंदाश्रमांत आले. आगत स्वागत झाल्यावर हरिभाऊंनी ज्ञानेश्वरीतील वरील ओवी काढली आणि तिचा अर्थ डॉक्टरसाहेबांस विचारला. ओवी ऐकतांच डॉक्टर म्हणाले, "ओवी प्रसन्न आहे." हरिभाऊ म्हणाले, "नुसती प्रसन्न असून काय उपयोग? तिच्यांतला अर्थ प्रसन्न झाला पाहिजे नां?" यावर डॉ. चिपळूणकर यांनी पुष्कळ वेळ डोके खाजवून पाहिलें, परंतु ह्या ओवीचा समाधानकारक अर्थ कांहीं त्यांस सांगतां आला नाहीं.

### शास्त्रीबुवांची विद्वता

'सुधारक' पत्र हरिभाऊंनी कांहीं दिवस चालविलें होतें हे पूर्वी सांगितलेच आहे. वाईचे धर्ममार्तंड काशीनाथ वामनशास्त्री लेले यांनी आपल्या वयाच्या बेचाळीसाव्या वर्षी अकरा बारा वर्षाच्या एका अल्पवयी मुलीबरोबर लग्न केलें म्हणून सुधारक पक्षाची पत्रें त्याजवर तुटून पडत होती. अर्थात मलाहि त्यासंबंधाने 'सुधारकां'त कांहीं तरी लिहिणें भाग होते. त्याप्रमाणें एक लहानसें स्फूट मी लिहिलें व तें हरिभाऊंस दाखविले. तेव्हा ते म्हणाले, "लेख ठीक आहे पण त्यांत कोठें तरी असें एक वाक्य घाला कीं "शास्त्रीबुवांची विद्वत्ता आतां इतकी वाढली आहे कीं, ती त्यांच्या पोटांत मावेनाशी झाल्यामुळें पाठींतून बाहेर पडूं लागली आहे !" मशारनिल्हे लेले शास्त्री यांच्या पाठींत एक कुबड होतें हें ज्यास ठाऊक असेल त्यांस हरिभाऊंच्या या विनोदांतील खोंच सहज समजण्यासारखी आहे.

### ललत छब तेरी

एकदां औरंगावादकडील एक गवईबुवा आनंदाश्रमांत येऊन राहिलें होतें. त्यांजपाशीं हरिभाऊ गायनाचा अभ्यास करूं लागले. मी एकेदिवशीं सकाळीं आनंदाश्रमांत गेलों असतां" ललत छब तेरी" येवढाच एक ललत रागांतला चरण हरिभाऊ मोठ्या गवई थाटांत घोळून घोळून म्हणत असल्याचें मी ऐकलें, तेव्हा मला मोठी गम्मत वाटली. हरिभाऊ म्हणाले, हा ललत राग आहे. पुढें थोड्याच वेळांत गवई बुवाहि तेथें आले व तेच पद मोठ्या आवाजांत स्वत: म्हणून दाखवूं लागले. इतक्यांत नानासाहेब जवळपास असल्याचे हरिभाऊंस कळलें व तो गायनसमारंभ त्याच क्षणीं बंद पडला. जुन्या पिढींतील सुशिक्षित लोक आपल्या वडील मंडळीचीं आपल्या हातून अवज्ञा न व्हावी एतदर्थ केवढी दक्षता बाळगीत असत, हें यावरून तरुण वाचकांच्या लक्षांत येईल.

### तुझे मन ते ठाऊक मला नाहीं

हरिभाऊ एखाद्यावेळीं लहरींत आले म्हणजे आपल्या आयुष्यांतल्या कांहीं जुन्या गोष्टी मला सांगत. एकदां त्यांनी पुढील गोष्ट सांगितली. हरिभाऊ विद्यार्थी दशेंत असतांना, बुधवारांत कुळकर्णी वगैरे त्यांचे कांहीं सहाध्यायी रहात असत तेथें ते अभ्यास करावयास जात. त्या विद्यार्थ्यांपैकी एकावर शेजारच्या खाणावळींतली एक तरुण विधवा प्रसन्न होऊन त्याचा पिच्छा पुरवूं लागली. परंतु तो कांहीं तिकडे फारसे लक्ष देईना. शेवटीं त्यांच्या मनांत तरी काय आहे हें समजून घेण्यासाठीं त्या बाईने शकुंतलेचे अनुकरण करण्याचें ठरविलें आणि एका पाटीवर "तुझे मन ते ठाऊक मला नाहीं" ही 'शाकुंतल' नाटकांतली दिंडी लिहून व ती पाटी डोक्यावर घेऊन तिकडे त्या विद्यार्थ्यांचे लक्ष वेधावे म्हणून समोरच्या गॅलरीत फिरू लागली. त्यावेळी तो विद्यार्थी, हरिभाऊ व इतर विद्यार्थीहि समोर एकाच जागी उभे होते. बाईच्या डोकीवरची पाटी पहिल्यानें हरिभाऊंनी पाहिली व तिच्यावर लिहिलेली दिंडी मोठ्यानें म्हणू लागले.! ते पाहतांच ती बाई जी घरांत पळून गेली ती पुन: तीन दिवस बाहेर आली नाही!

### 'आपणचि करितो गटका'

पूर्वी सरकारी शाळाखात्यांत पुष्कळ वर्षे काम करून पेनशन घेतलेलें एक विद्वान गृहस्थ पुण्यांत सदाशिव पेठेंत रहात असत. हे गृहस्थ मोठे विद्वान, रसिक असून लेखक व कवीहि होते. एका वर्षी एम. ए.च्या परीक्षेस ते हरिभाऊंचे जोडीदार परीक्षक होते. त्या वर्षी त्या परीक्षेच्या अभ्यासक्रमांत 'विठ्ठल कवींची काव्यें' हा एक विषय होता. अर्थात 'पेपर' मध्यें विठ्ठल कवीविषयीं कांहीं प्रश्न विचारणें परीक्षकांस भागच होतें, परंतु त्या कविविषयीं त्यावेळपर्यंत फारसे कोणीच कांहीं लिहिलेलें नसल्यामुळें वरील गृहस्थास त्या बाबतींत मोठी अडचण पडली. त्याच सुमारास माझ्या कविचरित्राचा दुसरा भाग मी लिहिला होता त्यांत विठ्ठल कवीवर एक बराच मोठा निबंध मी घातला होता. ही माहिती सदर गृहस्थास हरिभाऊंनी दिली तेव्हा त्यांनी "आजगांवकरांस माझ्या घरीं पाठवून द्या"असें हरिभाऊंस सांगितलें व त्याप्रमाणें हरिभाऊंनी मला सदर गृहस्थाच्या घरी जाऊन भेटण्यास सांगितलें.

दुसरे दिवशी संध्याकाळीं मी त्या गृहस्थाच्या घरीं गेलो तेव्हा ते, माझ्याशी पुष्कळ वेळपर्यंत अगदी मनमोकळेपणाने बोलले व स्वत:च्या आणि इतरांच्या किती तरी जुन्या पुराण्या गोष्टी त्यांनी मला सांगितल्या. शेवटी विठ्ठल कवीविषयीं प्रश्न निघाला तेव्हा' "कविचरित्राच्या ज्या भागांत सदर कवीविषयीं माझा निबंध आला आहे त्या भागाची हस्तलिखित प्रत मी डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रॅन्सलेशन सोसायटीकडे पाठविली आहे ती त्या सोसायटीकडून आपण मागवून घ्या," असें मी त्यांस सांगितलें व त्याप्रमाणें पुढें त्यांनी ती प्रत आणवून तिचा जो काय उपयोग करायचा होता तो केला.

मी सदर गृहस्थाच्या घरीं सुमारें दोन तास बसलों होतों, तेवढ्या वेळांत ते गृहस्थ दोन वेळां दूध प्याले व तेंहि अगदी सावकाशीनें. पण मला कांहीं त्यांनी दूध दिलें नाहीं. किंवा चहाहि दिला नाहीं. ही त्यांची तऱ्हा पाहून मला जरा आश्चर्यच वाटलें दुसरें दिवशीं मी आनंदाश्रमांत जातांच हरिभाऊंनी मला पहिला. प्रश्न केला तो हा "काय, आपणचि करितो गटका' भेटले काय? प्रश्नांतलें इंगित आरंभी माझ्या लक्षांत न आल्यामुळें मी हरिभाऊंस विचारलें, "आपणचि करितों गटका' हे गृहस्थ कोण?" हरिभाऊ म्हणाले, "ज्यांना भेटण्यास मी तुम्हांला सांगितलें होतें ते." मी म्हटलें, "काल मी त्यांच्या घरीं जाऊन त्यांना भेटलो." हरिभाऊंनी विचारलें, मग कसा काय अनुभव आला ? 'आपणचि करितों गटका' हे सदर गृहस्थांस मी दिलेले नांव योग्य आहे की नाहीं?" इतका खुलासा ऐकल्यावर माझ्या डोक्यांत प्रकाश पडला व माझा अनुभव हरिभाऊस सांगितला. हरिभाऊ म्हणाले, "हा कांहीं तुमचाच अनुभव नाहीं. सदर गृहस्थाच्या घरीं जाणाऱ्या प्रत्येक मनुष्याचा हाच अनुभव आहे आणि म्हणूनच आनंदतनय कवीच्या एका पदांतहि 'आपणचि करितो तटका' ही पदवी सदर गृहस्थास मी मोठ्या उदारपणानें बहाल केली आहे."

### लहान मुलांचे हरिभाऊ

हरिभाऊंस मुलें फार आवडत असत; परंतु ते स्वत: एखाद्या लहान मुलाप्रमाणें केव्हां केव्हां जे चाळे करीत ते पाहून हंसू येणें अगदी अपरिहार्य असे. हरिभाऊंची मुलगी ताई हिच्या करितां कोणी एक खेळणें आणले. हे खेळणें म्हणजे पीळ घातलेल्या एका










तारेंत एक लहानसा पंखा अडकविलेला होता. हा पंखा तारेच्या खालच्या टोकावरून वर दाबला म्हणजे तो तारेच्या वरच्या टोकांतून बाहेर पडून वर हवेंत भिंगरी सारखा कांहीं वेळ फिरत असे. हा प्रकार जेव्हां हरिभाऊंनी पाहिला तेव्हां त्यांना मोठी मौज वाटली व आनंदाश्रमाच्या हॉलमध्यें तो पंखा वर उडवून त्याची मौज पहाण्यांत त्यांनी सुमारें अर्धा तास घालविला ! खेळण्यासाठीं ताई इकडे सारखी ओरडतच होती.

### थोरांचा आदर !

जुने वयोवृद्ध कर्तबगार लोक आणि ग्रंथकार यांजविषयीं हरिभाऊंस मोठा आदर असे. ते एकदां मुंबईस आले असतां मला म्हणाले, "चला, रा. सा. विनायक कोंडदेव ओक यांना एकदां भेटून येऊ. रावसाहेब आतां बरेच वृद्ध झाले आहेत." ता. २७ मे १९१३ ची ही गोष्ट. त्या दिवशीं संध्याकाळी सुमारे पांच वाजण्याच्या सुमारास हरिभाऊ आणि मी गिरगांव बँक रोडवरील एका गल्लींतील रावसाहेबांच्या बिऱ्हाडीं गेलो. रावसाहेब बरेच खंगलेले दिसले. त्यांची दृष्टीहि जरा कमी झाली होती; पण त्यांच्या लेखनक्रमांत मात्र फारसा खंड पडलेला नव्हता. "रसिकांत वसायाचा" आपला मर अद्याप कायम आहे असें ते म्हणाले. 'बालबोधा'च्या नित्य व्यवसायाशिवाय 'आत्मचरित्र' लिहिण्याचाहि उद्योग रावसाहेबांनी सुरू ठेवला होता. हरिभाऊ त्यांच्याशी मोठ्या नम्रतेनें बोलले. रावसाहेबांचा निरोप घेऊन आम्ही निघालों तेव्हां त्यांनी आम्हाला एकेक छापील कार्ड पाकिटांत घालून दिले, त्यांत 'दर्शनाभिनंदन' या मथळ्याखालीं पुढील सुंदर श्लोक दिला होता:—

"प्रेमें सादर दर्शना मज दिलें येऊनि माझ्या घरीं ।  
वानावें उपकार हें न समजे शब्दांत कोणे परी ।।  
ठेवा लोभ असा निरंतर अशी माझी तुम्हां प्रार्थना ।  
होई दर्शन मागुती तव करीं मी आपणा वंदना ।।"

### व्याख्यान आणि दहा श्रोते

मुंबई युनिव्हर्सिटीची फायलों लॉजिकल लेक्चर्स देण्याचें काम एका सालीं हरिभाऊकडे होतें व त्यासाठीं ते मुंबईत आले होते. त्यांनी आपली व्याख्यानें नियमाप्रमाणें लिहून आणली होतीं. ही व्याख्यानमाला आरंभापासूनच फारशी लोकप्रिय नाहीं. त्यामुळें फारच थोडे विद्यार्थी व्याख्यानें ऐकण्यास हजर राहतात. हरिभाऊ सारख्यांच्या व्याख्यानासहि पांचदहांहून अधिक श्रोते मिळाले नाहींत. एके दिवशीं हरिभाऊ मालेचें एक व्याख्यान देण्यासाठीं युनिव्हर्सिटींत जाण्यास निघाले, तेव्हां मीहि त्यांच्यावरोबर होतो. राजाभाई टॉवरपर्यंत मी त्यांच्याबरोबर गेलो व तेथून दुसरीकडे जाण्यास निघालो. तेव्हा हरिभाऊ मला म्हणाले, "माझे व्याख्यान ऐकण्यास येत नाहीं कां? अहो तुम्ही आलांत तर तेवढाच एक श्रोता जास्त मिळेल." मी म्हटलें, "तुमची व्याख्यानें छापून प्रसिद्ध होतील तेव्हां तीं मी लक्ष्यपूर्वक वाचीन." हरिभाऊ म्हणाले, "आणि एरवीं मला तरी काय येवढी फिकीर आहे? पांच दहा श्रोत्यांपुढे तर काय, पण नुसत्या भितीपुढें जरी मला व्याख्यान द्यावें लागलें तरी तें देण्याची माझी तयारी आहे. व्याख्यानें द्यावयाची आणि बिलाचे पैसे घ्यावयाचे एवढें आपलें काम." चांगल्या नामांकित विद्वानांची विद्वत्तापूर्ण व्याख्यानें फुकटची ऐकून घेण्यासहि तरुण पिढी तयार नाहीं याबद्दल वाटणाऱ्या विषण्णतेची थोडीशी झांक हरिभाऊंनी दिलेल्या या उत्तरात आहे.

## हरिभाऊंनीं सुशिक्षित स्त्रीला लिहिलेलें पहिलेंच पत्र



काशिताई कानेटकर

कला व वाङ्मय प्रांतांत कांहीं चिरंतन प्रेमाची उदाहरणें आढळतात. पति पत्नी, प्रियकर प्रेयसी, मित्र मैत्रिण व बहीण भाऊ ! अशी ! कै. काशीताई कानिटकर व कै. हरिभाऊ आपटे यांचं मानलेलं भावा बहिणीचं नातं व परस्परांवरील "अक्षय" प्रेम मराठी वाङ्मयांत अजोड व अमर असें राहील. इ. स. १८८५ सालीं हरिभाऊंनी काशीताईंना पहिलें पत्र लिहिलें. ते लिहितातः—

आर्धी स्त्रियांना पत्र लिहिण्याचा हा पहिलाच प्रसंग. आणि त्यांतहि आपल्यासारख्या सुशिक्षितांस ! मग काय विचारतां ? मी तर भांबावून गेलो आहे. आज बरोबर चार दिवस झाले. आपल्याला पत्र कसें पाठवावें या विचारांत मी गढून गेलो होतो . . . आपलें पहिलेंच पत्र मला काल आलें : तें वाचून जो माझ्या मनाला आनंद झाला आहे तो पत्रीं तर काय, परंतु एखाद्या पुस्तकांत वर्णू म्हटल्यास देखील मला वर्णन करतां येणार नाहीं . . .

### 'करमणुक' व वर्गणीदार!

हरिभाऊंनी 'करमणूक' पत्र सुरू केले त्या वेळीं वऱ्हाडांतील कांही श्रीमंत पाटील त्याचे वर्गणीदार झाले. खरा प्रकार असा होता कीं, त्या पाटलाच्या मुलाचे जे शिक्षक होते ते 'करमणुक' स्वतःस वाचावयास मिळावी म्हणून, "तुम्ही पत्राचे वर्गणीदार व्हा म्हणजे तुमचें नांव छापून येईल" असें सांगून त्यांना वर्गणीदार करीत असत. व दर आठवड्याच्या अंकावर आपलें नांव छापलेलीं पत्त्याची चिठ्ठी चिकटवलेली असतें हे पाहून पाटील खुष होत असत. परंतु प्रत्येक नवीन वर्गणीदारासाठीं, त्याच्या नांवाची व पत्त्याची चिठठी कोणी छापून घेत नसतो; बरीच नांवें गोळा झाली म्हणजे मग पत्त्याच्या चिठ्या छापून येतात; व तोपर्यंत नांवें व पत्ते हातानेंच लिहितात. आपलें नांव, अशा रीतीने, हातानें लिहिलेले पाहून कांही पाटील वर्गणीदार रुष्ट झाले व त्यांनी हरिभाऊंस कळविलें कीं आमच्या गांवातील दुसरे पाटील आहेत, त्यांचेकडे येणाऱ्या अंकावर त्यांच्या नांवाची व पत्त्याची छापील चिठ्ठी चिकटवलेली असते आणि आम्ही तेवढीच वर्गणी भरली असतां आमच्या अंकावरची चिठ्ठी हाताने लिहिलो असते. तरी हा आमचा मोठा अपमान आहे. म्हणून आमचे नांव छापलें जाईपर्यंत अंक पाठवूं नये." बरीच नांवें गोळा झाल्याशिवाय चिठ्ठ्या छापून घेतां येत नाहींत, म्हणून तूर्त त्या हातानेच लिहाव्या लागतात. यांत आपला कोणताहि प्रकारें अपमान करावा असा आमचा मुळीच हेतु नाहीं, असें हरिभाऊंनी त्यांना परोपरीनें समजावून सांगितलें, परंतु त्यांची समजूत पटली नाहीं. ●●●







अनुक्रमणिका

*हे पत्र फोडाल तेव्हां माझ्या कुडींतून माझे प्राण गेलेले असतील. माझे असें काय-ते 'स्मरणच' तुमच्याजवळ राहील....*

# हरिभाऊ

## एक भावदर्शन

--प्र. श्री. नेरुरकर



**हरिभाऊंच्या** 'पण लक्षांत कोण घेतो ?' या श्रेष्ठतम कादंबरीचं पहिल्या प्रकरणांतील पहिलंच वाक्य असं आहे, 'ते दिवसाची आठवण झाली म्हणजे मला अजूनदेखील हंसूं येते व मोठी मजा वाटते.' त्या प्रकरणाचं नांव आहे 'लहानपणची आठवण !'....आज आम्ही सुद्धां जेव्हां मागे वळून पहातो तेव्हां लहानपणच्या आठवणी जागृत होतात व त्या आठवणींत 'हरिभाऊ' हें नांव, ही स्मृति, हा एक भावस्फुल्लिंग कुठे तरी चाळवला जातो आणि मजा वाटते. हरिभाऊंच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने तर ही स्मृतीची कोवळीक अधिकच नाजूक होते, तरलतम होते व गहिंरी गडद पण होते. 'ते हि नो दिवसा गतः' असं वाटूं लागतं आणि हरिभाऊंच्या सहवासांत, त्यांच्या जणूं कुशींत, जणूं त्यांच्या मांडीवर जणूं त्यांच्या अंगाखांद्यावर खेळणारे आम्ही इतके मोठे, प्रौढ, वयस्कतेकडे झुकणारे गृहस्थ झालों हें खोटंच वाटतं व तें कधीच खरं पण वाटूं नये असं खरोखरच सारखं वाटतच राहतं. लहानपणाच्या कुठच्या तरी शालेय पुस्तकांतूनच प्रथम हरिभाऊंनी आम्हांला 'जीवित महिमा' निवेदन केला.

'असार जीवित केवळ माया रडगाणे हें गाऊं नका' हें वचन हरिभाऊंच तेव्हां आमच्या कानीं गुणगुणले....याचं सार त्यावेळीं क्वचितच कळलं असेल !....आणखी पण त्यांनींच आम्हांला पुढील मंत्र त्याच गीतांत दिला होता . . . (आजहि तो आठवतो. नव्हे कधीं त्याचा विसरच पडला नाहीं.)

थोर महात्मे होऊन गेले<br>
चरित्र त्यांचे पहा जरा<br>
आपण त्यांच्या समान व्हावें<br>
हाच सापडे बोध खरा

नंतर मग कालांतराने आम्हाला लाँगफेलो भेटला; पण त्याची पहिली अध्यात्मिक गांठ घालून दिली होती हरिभाऊंनी !

विलक्षण संस्कारक्षम आणि संवेदनाक्षम असा तो बालपणाचा काल होता. त्या काळांत हरिभाऊंची पुस्तकें आमच्या हातांत पडावी हें मला वाटतं आमच्या पिढींतील मुलांच्या जीवनांत अपरिहार्य होतं. इंग्रजी शाळेंत जायला लागल्यावर, शाळेच्या वाचनालयांनें आम्हांलां पुस्तकें दिली त्यांत हरिभाऊंची पुस्तकेंच पुष्कळदां हातांत येत. घरीं दारीं कुठें वडिलांच्या किंवा आजोळी आजोबांच्या पुस्तक संग्रहावर चोरून हात टाकूं लागलो तर हाताला वरीचशी पुस्तकें प्रथम लागली, ती हरिभाऊंचीच होती. इंग्रजी दुसरींत असतांना 'गड आला पण सिंह गेला' प्रथमच वाचलं आणि शिवाजी, तानाजी, रायबा, शेलारमामा कुठें तरी अंतरांत खोल खोल जाऊन घर करून वसले. ती कमल कुमारी ! तो उदयभानू ! . . . . त्यांचंहि घर या सर्वांच्या घराजवळपासच. तेव्हां जें बांधलं गेलं तें आजहि, अद्यापि अजून तिथेंच आणि तसंच आहे....

मग हातीं 'उषःकाल' आला; 'सूर्योदय' आला; आणि अजूनहि आठवतं कीं त्या वाचन समाधीच्या क्षणाला वाटायचं 'सूर्यास्त' कधींच येऊं नये. शिवाय.... तें पोरवय होतं. पण जेव्हां 'पण लक्षांत कोण घेतो' ही कादंबरी हातीं आली, आणि मी महापुरांत एखादा ओंडका वहात





अनुक्रमणिका

जावा तसा तिच्या कथौघांत वहात व बुडत पुढें पुढें जाऊं लागलो तसं कुठेंतरी जीवनाने जखमी केल्यासारखं वाटूं लागलं. अश्रू आटत आहेत आणि रक्त उफाळत आहे असं जाणवलं. अम्दुतरम्यतेच्या अवास्तव जगांतून कुणीतरी मनाला वास्तवतेच्या भीषण व वेदनामय जगांत खेचून व ओढून आणतो आहे, असं भासलं. आणि ते हरिभाऊ आपटेच आहेत असं स्पष्ट दिसत होतं. डोळयांना व मनाला; कोणत्या तरी अननुभूत आनंदांत कोणीतरी अनामिक वेदना मिसळत होती; कोणत्या तरी अव्यक्त वेदनेला उत्कट भावानंदाचा स्पर्श होत होता. एक भाव, एक आनंद, एक वेदना . . . नव्हे, केवळ एकमेव एकच एक वेदना म्हणजेच हरिभाऊ असं समीकरण मनांत व बुद्धींत जुळविलं जात होतं....तेंच नंतर कायमचं जुळलं; बुद्धीला जडलं . . . .

त्यानंतरें मुळिंच कांहीं न वोलता ते
कारूण्यमूर्ति परतें अपुल्या गृहातें
दुःखे फुटे हृदय, शोक अपार झाला
तो राहु देइ मग शांतपणे तियेला

या ओळी 'पण लक्षांत कोण घेतो'च्या प्रारंभीच्या पानावर तेव्हां वाचल्या; तेव्हां पासून या क्षणापर्यंत त्यांची गुणगुण हृदय गर्भी चालूच आहे. पहिली स्त्री जाणवली; स्त्रीचं अमाप दुःख जाणवलं; एक परम वेदना स्त्री म्हणून अंतःकरणावर संस्कारित झाली; ती टिकून राहिली; तीच व तीच एकमेव भावरूप घेऊन साकार व सत्य बनली. आणि मग तदनंतर इतर अनंत स्त्रीयांची सुखे व दुःखे तिने आपल्यांतच सामावून घेतली. ती एकच स्त्री म्हणजे यमू ! त्यानंतर शरद् वावूंची भेट पडली; रवीवावूं भेटले; प्रेमचंदांची गाठ पडली; हार्डी, स्वीनवर्न, झोला, टॉल्स्टॉय, गोर्की, वाचनांत आले. ॲना कॅरेनिनेचं वेदनेचं जग अनुभवलं; टेसची वेदना जीवाचं पाणी करून आणि रक्त आटवून गेली; इतरहि अनेकजणीं आत्मवेदना वोलून गेल्या; सीतेपासून तो टेसपर्यंत पण सगळ्याजणीं शेवटीं विसर्जन पावल्या त्या प्रथम येऊन व अंतर्यामीं अनंत जागा व्यापूनह उरलेल्या यमूंत आणि यमूंतच . . .

कंटाळलीच जगण्यास, झिजूनझिजून
ते शेवटीं सुटली; गेलि जगा त्यजून . . .!

अशा किती स्त्रिया झिजून झिजून व न झुंजता जगाला त्यजून गेलेल्या हरिभाऊंनी तत्कालीन समाजांत पाहिल्या असतील कुणाला ठाऊक ! स्त्री म्हणजे जणू क्षणाचा आनंद व चिरंतनाचें कारूण्य ! स्त्री म्हणजे कारूण्यमूर्ति ! स्त्री हीच एक वेदना; हीच एक स्त्री ! हरिभाऊंची लेखणी या स्त्रीने फोडलेला मूक टाहो मूर्तिमंत शद्वब्रह्म होऊन सतत तीस चाळीस वर्षे महाराष्ट्रांत वावरली . . . त्या वेदनेने व्याकूळ होऊन विव्हळणारा हरिभाऊ एवढा थोर माणूस, थोर कलावंत, थोर कादंवरीकार व समाजसेवक त्या काळांत एकटे हरिभाऊच होते.

नियतीने हरिभाऊंना जन्मक्षणापासून कधी दया दाखविली नाही व माया दिली नाहीं. माघमासांत एका अमावास्येच्या दिवशीं हरिभाऊ एका कोकणस्थ कुटुंबांत जन्माला आले. त्यांचं सगळंच वास्तव्य या इहलोकांत उणंपुरं पंचावन वर्षाचं झालं. लहानपणीच ते मातृसुखाला आचवले; तरूणपणी पत्नी सुखाला ते दुरावले; अर्ववृद्ध अवस्थेंत नामदार गोखल्यांसारख्या जिवलग मित्राला ते मुकले; एकुलती एक कन्या शांताताई हातीं ओठीं येतें न येतें तोंच काळानें तिला त्यांच्यापासून तोडून नेलें; हरिभाऊंचें दुःख हें असें अमर्याद होतें व म्हणूनच त्यांची वेदना बोलकी झाली . . .

अमुचा पेला दुःखाचा
डोळे मिटुनी प्यायाचा

असंच केशवसुतांवरोबर हरिभाऊ पण वोलून जातात. कवि शॅले जी एक आर्त ओळ लिहून जातो तीच हरिभाऊंची पण सहसंवेदना होती . . .

I fall upon the thorns of life
And I bleed.

हरिभाऊंच्या लेखणीने कदाचित् घटकाभर करमणुकीसाठीं शाई प्याली असेलहि पण कला निर्मितीसाठीं तिला रक्त ओकावं लागलं आणि रक्तानं लिहावं लागलं. कारण हरिभाऊंची वेदना ही खरीखुरी होती. मात्र हरिभाऊंनी स्वतःला कांहीं मर्यादा घालून घेतलेल्या स्पष्ट दिसतात. आपल्या वेदनेला त्यांनी वाह्यांत होऊं दिलें नाहीं. पूर्ण संयमानें त्यांनी तिला कह्यांत ठेवलें; केवळ कण्हण्याइतकीच ती वेदना त्यांनी साकार होऊं दिली असं कधीं कधीं वाटतं. समकालीन समाजांतील स्त्रीचं कण्हणं तेवढंच हरिभाऊंनी आपल्या वोटांची लेखणी करून दाखविलं, तिच्या मूक क्रंदनाला त्यांनी नसत्या आरडचा ओरडण्याचं आक्रस्ताळी स्वरूप येऊं दिलं नाही; कारण हरिभाऊंचं दुःख हें खोल खोल जाणारं असं होतं. तें जिवंत होतं. जाळणारं आणि जळणारं होतं. म्हणूनच हरिभाऊंच्या सर्व सामाजिक कथा कादंवऱ्यांतील 'मी' हा दडून रहात नाही. आपल्या भोंवतालचं 'जग हें असं आहे' हें या 'मी'नं ओळखलं होतं. 'पण कोण लक्षांत घेतो ?' ह्या प्रश्नचिन्हानं हा 'मी' भांवावून जातो, आणि नंतर लक्षांत घेणारा 'मी' पण हा 'मीच' होतो.


चुलते —महादेव चिमणाजी

'मी' कादंबरींत एके ठिकाणीं हा आपल्याशींच म्हणतो, 'काय ? माझी अशीच स्थिति आहे काय ? या होडींत वसून येणाऱ्या माणसाप्रमाणें आपलें पुढचें सर्व

आयुष्य निव्वळ एकटयानें व वल्हवीत वल्हवीत पुढें ढकलावयाचें काय ? त्याला कांहीं हेतु नाहीं ? मला कोणी मदत नाही ? माझ्या बरोबरच आपलेंहि सर्वस्व टाकून चार वल्हीति मारण्याला कोणी यणारं नाहीं ? मी एकटाच ? आई गली, बापाचा ठिकाणा नाही. ताईहि गेली. 'माझे' असें म्हणण्यास कोणी नाहीं ? मी अगदीं एकटा. मला अमुक ठिकाणीं जाऊन पोचायचें असें तरी कोठें आहे ? तेंहीं नाही. माझी स्थिति काय होणार ? मला कर्तव्य काय ? कोठें तरी प्रकाश ?....पाहा, कोठें ही पाहा. कोठेंहि नाही पण असें कां ? आहे. तसा दिवा दिसतो आहे. आपण एकटेच नाही. मनांत आणल्यास सर्व कांहीं होईल .....'

हरिभाऊंच्या भावजीवनांत तसाच वास्तविक जीवनांतहि हा छाया प्रकाशाचा खेळ अखंड चाललेला दिसतो. हरिभाऊंची लेखननिर्मिती हा कोणताहि अकस्मात् घडून आलेला अपघात नव्हता. व्रत त्यांनीं अंधपणानें घेतलें नव्हतें. ती एक डोळस जाणीवेंत रूजलेली व सामुदायिक जीवनाबरोबरच त्यांच्या व्यक्तिगत जीवनांत विकासलेली जिवंत निष्ठा होती. न्यायमूर्ति रानडे, विष्णुशास्त्री चिपळूनकर, रामकृष्णपंत भांडारकर, प्रा. वासुदेव बाळकृष्ण केळकर, लोकमान्य टिळक, रँग्लर परांजपे, वि. मो. महाजनी, विष्णु बळवंत पंडित, शंकर मोरो रानडे, गोपाळराव गोखले आणि इतर अनेक यांच्या अंवतीभोंवती हरिभाऊ वावरत होते. ते शोधत होते व जीवनाचा वेध घेत होते. सांपडेपर्यंत व सांपडल्यानंतरहि ते थांबणार नव्हते. थांबण्यासाठीं नियतीने त्यांना उसंतच दिली नाही. आगरकरांनी जें बुद्धीने टिपलं तेंच हरिभाऊ भावनेने टिपणार होतें. आगरकरानी 'सुधारक' जाहीर केल्यावर हरिभाऊंनी आपल्या मानलेल्या वहिणीला काशीताई कानेटकरांना जें इंग्रजी पत्र लिहिले त्यांत हाच उदेक ते जळजळून व्यक्त करतात . . . ते लिहीतात,

"I was so very glad to read the prospectus, that my first thought was to go and give my respects to the worthy professor with these words, "Well done, Prof. Agarkar. You are a great man Expose those jackdaws under the garb of peacocks and if you allow me, I shall very gladly and enthusiastically assist you in plucking off their false feathers..."

'दास रूढीचे खवळूं द्या' असा पुकारा केशवसुतांनी काव्यांतून केला: आगरकरांनी 'सुधारक' काढून आणि हरिभाऊंनी आपल्या कादंबऱ्या लिहून रूढीचे दास ढवळून व खवळून टाकले. परंपरागत चालत आलेल्या चातुर्वण्य व्यवस्थेतील सर्व श्रेष्ठ वर्ण हरिभाऊंच्या वाटयाला आला होता. त्या पांढरपेशा पुढारलेल्या वर्गातच स्त्री ची स्त्रीयांकडून व पुरुषांकडून अमानुष विटंबना चाललेली हरिभाऊंनी लहानपणापासून पाहिली. तें सामाजिक व्यंग त्यांच्या जिव्हारी झोंबलं आणि मग हरिभाऊंचं भावजीवन अक्षय वेदनामय झालं. व्यथित झालं. त्या एकमेव व्यथेच्या अनंत कथा म्हणजेच हरिभाऊंच्या लेखणींतून जीवनभर लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्या, कथा, कहाण्या . . .

या विशाल पार्श्वभूमीवर हरिभाऊंचं जीवन हीच एक कर्मकहाणी ठरली.



हरिभाऊंच्या प्रथम पत्नि

तसं पाहिलं तर हरिभाऊंचं जीवन साधं, सीधं, सोपं व स्वास्थाचं होतं. आयुष्याच्या अर्ध्यावर अकाली मृत्यू येण्यापूर्वी आर्थिक विपत्तिमुळें त्यांना कलकत्त्यासारख्या शहरापर्यंत कांहीं शेअर खपविण्यासाठीं जावं लागलं हें खरं; त्याचा त्यांच्या शरीरमनावर विपरित परिणाम होऊन त्यांचा जीवनदीप अकस्मात विझला हेंहि खरंच; पण तोपर्यंत आनंदाश्रमांतील एक बैठकी जीवनच हरिभाऊंच्या वाटयाला आलं होतं: पितृ व मातृ सुखाला हरिभाऊ अंतरले होते; पण त्यांचे चुलते महादेव चिमणाजी आपटे यांनी त्यांना सदैव आधार दिला होता आईची जागा त्यांच्या चिमाभावशीनं घेतली होती. तसं खाऊन पिऊन सुखी असं त्यांचं जीवन होतं. चुलत्यांना त्यांनीं सरकारी नोकरी न करण्याचा धीट सल्ला दिला होता व स्वत:ला त्यांनी नोकरीच्या शृंखलांनीं बांधून घेतलें नाहीं. १८८३ सालीं प्रवेश परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनीं डेक्कन कॉलेजांत प्रवेश केला. पण पी. ई. ची परीक्षा गणित विषयामुळें ते अनुत्तीर्ण राहीले. १८८५ साली फर्ग्युसन कॉलेजची स्थापना झाल्यावर ते त्याहि कॉलेजांत गेले. त्यांची विद्यार्थी दशा चोवीसाव्या वर्षापर्यंत चालू होती. मात्र पदवी कांहीं त्यांना घेतां आली नाहीं. आणि ती खंत त्यांच्या मनाला निरंतर टोचत राहिली.

कांहीं काळ शिक्षक, नंतर मुद्रणालय व वृत्तपत्र; नंतर आनंदाश्रमांतील वास्तव्यांत त्यांनी जोपासलेलें स्वत:चे पुस्तकालय; भोंवती गोळा केलेला मित्रपरिवार आणि फ्रेंच, जर्मन इत्यादि भाषांचा त्यांनी केलेला अभ्यास व चालू ठेवलेला व्यासंग....असा हरिभाऊंचा संपूर्ण जीवनक्रम सांगता येईल.

वयाच्या पंचवीसाव्या वर्षी त्यांनी 'करमणूक' पत्र सुरू केलें त्याची उद्दिष्टें. त्यांनी उद्घोषित केली होती ती अशी :

(१) लोकांमध्यें आत्मविश्वास उत्पन्न करून त्यांना पूर्ववैभवाचें स्मरण देणें.

(२) ज्या अवगुणामुळें व सामाजिक दुष्ट चालीरीतीमुळें आपली अवनति झाली त्याचा त्याग केल्याशिवाय पूर्ववैभवाचें पुनरुज्जीवन होणें नाहीं हें सत्य लोकांच्या मनावर ठसविणें....

त्यांनी आपली राजकीय व सामाजिक निष्ठा रावसाहेब रानडयांना दिली होती. आगरकरांपासून त्यांनीं समाजसेवेची सक्रीय दिक्षा घेतली होती. त्यावेळच्या पुणे शहराच्या नागरिक जीवनांत ते समाजकार्यकर्ते म्हणून समरस झाले होते. वीस वर्षे पुणे नगरपालिकेचें ते सदस्य होतें व तीन वेळा अध्यक्ष होण्याचा मान पण त्यांना मिळाला होता. राष्ट्रीय सभेचे ते क्रियाशील पण कट्टे भक्त होते. रानडे, पक्षाचे 'ज्ञानप्रकाश' हे पत्र निघालें तेव्हां सात आठ वर्षे ते त्या पत्राच्या इंग्रजी विभागाचे संपादक होते. १८९७–९८ सालीं प्लेगनें पुण्यांत कहर केला.; त्यावेळीं हरिभाऊंनीं केलेली लोकसेवा फार मोठी होती. इंग्रज सरकारने त्यांना 'कैसर-इ-हिंद' हा किताब बहाल केला होता. 'I believe in evolution; not in revolution' असें हरिभाऊंनीं एकदां म्हटलें होतें. त्यांची व नामदार गोपाळराव गोखल्यांची मैत्री जडली व ते दोघे आयुष्यभर अशा कांहीं दाट व दृढ स्नेहभावनेनें एकजीव झालें कीं तिची तुलना क्वचितच इतर कशाशीं त्या काळीं करतां आली असती !

१८९७ सालीं त्यांनीं 'काळ तर मोठा कठीण







अनुक्रमणिका

भाला' ही दीर्घ कथा लिहिली व तिचें इंग्रजीत Ramji, The Tragedy of Indian Famine असं मापांतर करून इंग्रज सरकारला दुष्काळी परिस्थितीचा इशारा देण्याचं कार्य केलं. मात्र हरिभाऊंचा पिंड हा मवाळांच्या व नेमस्तांच्या पठडींतला बनत गेला. साहजिकच कलावंत म्हणून हरिभाऊंना आपोआपच त्यामुळें बंधनें घालून घ्यावी लागली. ऐतिहासिक कादंबऱ्यांतून पर्यायानें त्यांनी आपल्या राजकीय भावभावनांना वोलके करण्याचा प्रयत्न केला. पण तो वास्तवतेपासून अलिप्त असाच राहिला.

कलावंताच्या कलंदरपणापासून हरिभाऊ कटाक्षानें दूर राहिले. एक शालीन, सभ्य, सरळ चाकोरींतील जीवन ते जगले. लहानपणापासून जाणवलेल्या वेदनेचा अर्थ त्यांनीं समाज मनांतून लावला तसाच तो पुस्तकळदा पुस्तकी पण झाला. ग्रंथकर्तृत्व ही प्रेरणा प्रामुख्यानें त्यांच्या या वेदनेंतूनच त्यांना मिळाली खरी; पण मग तिला त्यांनी एक संवय केली.व शिस्त लावली. म्हणून झोला किंवा टॉल्स्टॉय किंवा हार्डी या कादंबरीकारांप्रमाणेंच ते बेछूट व बेहोश होऊन कलानिर्मितीची साधना करूं शकले नाहींत. पण म्हणून काय झालें ?

आतां थोर वयांत हरिभाऊंकडे पुनः गेल्यावर पोरवयांत हरिभाऊंनीं केलेलं संस्कार आठवतात. आगरकरांनीं आम्हांला विचार दिला. पण हरिभाऊंनीं आम्हांला वेदना दिली. वेदना ओळखायला शिकवलं व वेदनेला बोलकी करण्याचा मंत्र दिला.

हरिभाऊंना जन्मून आज शंभर वर्षे झालीं; आणखी पण शंभर; सहस्त्र वर्षे केव्हांतरी होऊन निघून जातील...मात्र 'भवसागरीच्या वाळवंटीवर चार पाऊलें उमटवूं अपुली' म्हणणाऱ्या हरिभाऊंनीं मराठी वाङमयाच्या सागरतीरावर जीं चार पावलें प्रथम उमटवली तिचा मागोवा--घेत घेत आणखी कित्येक पिढ्या आज व उद्यां साहित्यक्षेत्रांत पुढें पुढें पाऊलें टाकत राहतील व तसेंच त्यांनीं करण्यांत त्यांचा व मराठी भाषेचा व हरिभाऊंचा मोठेपणा शाश्वत काळ टिकून राहील.

हरिभाऊ केवळ एक शक्ति म्हणून जेव्हां समोर येतात तेव्हां त्यांचं चित्र कारुण्याची छटा घेऊन उभं राहतं. लहान मुलांचा त्यांना लळा लागावा हें साहजिकच होतं. स्वतःची एकुलती एक लाडकी कन्या सात वर्षे त्यांनीं फुलाप्रमाणे जतन केली. किती स्वप्नें त्यांनीं तिच्या संबंधांत रेखाटली! तिचं जीवन हेंच उत्तर आयुष्यांत हरिभाऊंचं जीवन झालं होतं. पण ती एके दिवशीं निघून गेली. कालवश झाली. हरिभाऊ हताश झाले. नैराश्यानें पुरे ग्रासले

शिवजयंतीच्या सुमुहूर्तावर
४ वर्षांपूर्वी....
मराठी भाविकांचें अनेक वर्षांचें स्वप्न
साकार झालें....
**महाराष्ट्र राज्य निर्माण झालें !**
तो भाग्यदिन साजरा करण्यासाठीं
दीपावलीच्या
येत्या मे अंकात
**नव-महाराष्ट्र—गौरव पुरवणी**
प्रकाशित करण्यांत येईल.

गेले. इतकें कीं त्यानंतर त्यांच्या लेखणीला त्यांनी चार वर्षे विराम दिला. आपल्या ताईची स्मृति त्यांच्या भावगूढ दृष्टीसमोर सतत तरळत राहिली.ऐन उमेदींत असतानांच त्यांचे परममित्र नामदार गोखले त्यांना सोडून गेले. आपल्या अखेरच्या आयुष्यांत या घटना आठवून हरिभाऊंचं हृदय व्यथित व व्याकूळ होत होतं. १९ फेब्रुवारी हा दिवस आपल्या आयुष्यांतील अत्यंत अशुभ दिवस ते मानीत. त्यांच्या शेवटच्या आजारांत तो दिवस आला तेव्हां ते विलक्षण खिन्न व उदास झाले. आपल्या एका निकटवर्ती मित्राला ते म्हणाले १९ फेब्रुवारी हा दिवस माझ्या आयुष्यांतील अत्यंत दुःखाचा आहे; कारण याच दिवशीं सात वर्षांपूर्वी माझी एकुलती एक मुलगी आणि चार वर्षांपूर्वी एक अत्यंत जिवलग स्नेही मला सोडून गेला. गोपाळराव गोखले वारले त्या सकाळीं मी त्यांच्याजवळ होतो. संध्याकाळीं घरीं परत आलों. जरा वसतों तों रात्रीं दहा वाजतां सोसायटींतून निरोप आला कीं गोखले अत्यवस्थ आहेत. सोसायटींत येऊन पाहतो तर गोपाळराव आरामखुर्चीवर पडले असून शेवटल्या स्थितींत आहेत आणि सर्व मंडळी समोंवार उभी आहे. मी जवळ जातांच त्यांनी डोळे उघडले. व 'माझ्याकडे पाहून 'हरिभाऊ, जातों आतां..' असें हंसून म्हणून नमस्कार केला. लागलीच मान टाकली. आणि सर्वच आटोपलें. जणूं काय माझा निरोप घेण्यासाठींच ते वाट पहात होते"...ही शेवटची वाक्यें बोलत असतां त्यांचा कंठ दाटून आला. मग दीर्घ निःश्वास सोडून ते म्हणाले....

I lost two of my dear persons yesterday. I thought I would be the third to follow them ! ...

हरिभाऊंचे हे उद्गार दि. ३ मार्च १९१९ रोजीं खरे झाले. या मृत्युदिनी ते अखेरपर्यंत शुद्धिवर होते. त्यांची मनःशांति किंचितहि ढळली नव्हती. त्यांची पहाटे उठून वाजविण्याची एकतारी समोरच बिछान्याजवळ पडली होती. पंच पंच उषःकाली तुकाराम बुवांचे अभंग एकतारीवर भक्तिभावानें म्हणणारी त्यांची वाणी मूक झाली होती. त्यांनीं आपल्या डॉक्टरांना विचारलं, डॉक्टर, या जगांत आतां माझा अवशिष्ट काळ किती उरला आहे?'

डॉक्टर म्हणाले, 'तसें निश्चित कसें सांगतां येईल? कदाचित् आपण आणखीहि कांहीं दिवस जगाल....'

पण कदाचित हरिभाऊंना जगण्यांकरिता आतां कांहीं एक व कोणी एक उरलं नव्हतं. हरिभाऊंनीं इच्छामरणी भिष्माचार्यांच्या विराट इच्छाबुद्धीने डोळे मिटले ते पुनः उघडलेच नाहींत. मराठी कादंबरीचे प्रपितामह चिरनिद्रिस्त झाले. नामदार गोखल्यासारख्या मित्रांना व त्यांच्या जिवलग ताईला भेटण्यासाठीं जणूं ते आतूर झाले होते. हरिभाऊ निघून पावले आणि एक चिरवेदना चिरंतनाची मूकी झाली. अबोल झाली!

'मी'च्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे...

"झालें, हें पत्र फोडाल तेव्हां माझ्या कुडीतून माझे प्राण गेलेले असतील. माझें असें काय तें 'स्मरणच' तुमच्याजवळ राहील. तें स्मरण तुम्हांला नेहमी राहून तुम्ही कार्यांचा पुढाकार कराहीत शेवटची प्रार्थना. हेंच शेवटलें मागणें, हीच शेवटची विनंती..'

आज महाराष्ट्र हरिभाऊंचें स्मरण करीत आहे. हें स्मरण करीत असतांना हरिभाऊंच्या आत्म्याला छळणाऱ्या चिरवेदनेचें विस्मरण त्याला कधींहि न पडो.

●●●

अनुक्रमणिका







# हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या

न. र. फाटक

**हरिभाऊ** आपट्यांनी ऐतिहासिक कादंबऱ्या लिहून मराठ्यांचा इतिहास लोकप्रिय होण्याला मदत केली ही वस्तुस्थिति कबूल केली पाहिजे. मराठ्यांच्या इतिहासावर त्यांच्या उषःकाल, सूर्योदय, सूर्यग्रहण केवळ स्वराज्यासाठीं, मध्यान्ह, आणि गड आला पण सिंह गेला, याप्रमाणें ज्या कादंबऱ्या आहेत; त्यांतल्या मध्यान्ह सोडून बाकीच्या शिवकालाशी संबद्ध आहेत. मध्यान्हचा संबंध पेशवाईशी आहे. शिवाजी महाराजांचा विषय आपल्या कथांतून गुंफतांना हरिभाऊंच्या डोळ्यासमोर त्यांच्या वाचनांतील इंग्रजी, फ्रेंच किंवा कदाचित् कांहीं जर्मनी भाषेंतील ऐतिहासिक कादंबऱ्यांचीं कथानकें असलीं पाहिजेत याचा प्रत्यय ह्या भाषणांतील कादंबऱ्यांची ओळख असणारांना सहज येऊं शकतो. हरिभाऊंची शिवचरित्राचा विकास दाखविणारीं कथानकें वाचीत असतांना ती कितीहि मनोवेधक असली तरी ज्यांना शिवाजी महाराजांच्या पराक्रमाचा व उद्योगाचा प्रारंभकालीन प्रदेश ठाऊक आहे, त्यांना तो प्रदेश कादंबऱ्यांतून रेखाटलेला दिसत नाहीं. सिंहगड, पुरंदर, तोरणा, राजगड, मोरा-लगतचा रोहिडा—त्यांतल्या त्यांत तोरणा राजगडाचें मावळ-हीं स्थळें उत्तम परिचित आहेत, त्यांना ह्या प्रदेशांतील नद्या, डोंगर, खिंडी, किर्रर झाडींतलीं लहान लहान शेंदरी दैवतांचीं मंदिरें, यांतलें काहींच आढळत नाहीं. आज सिंहगड, पुरंदर हे आजूबाजूची रानें तुटल्यामुळें सहज दिसण्यासारखें उघडे पडले आहेत. राजगड तोरणा हे सिंहगडाच्या मागील अवघड डोंगरी भागांत असल्यामुळें तिकडे सहसा कोणी जात नाहीं. आज तोरण्याच्या पायथ्यापर्यंत मोटार बस अशी वाहनें जाऊं शकतात. हरिभाऊ कादंबऱ्या लिहूं लागले तेव्हां हीं वाहनें तर नव्हतींच परंतु बैलगाड्यांचे रस्तेदेखील अगदीं प्राथमिक अवस्थेंतले होते. पायचाल हाच एक राजगड तोरणा गाठण्याचा एक खात्रीचा उपाय होता. पण हरिभाऊंना हा उपाय स्वीकारणें शक्य झालें नसल्यास आश्चर्य वाटायला नको.

उषःकालाचे कथानक तोरणा काबीज करण्यापूर्वीचें असून त्यांत शिवाजी महाराज वरेचसे पड्याआड आहेत. वलमीमाचें एक देऊळ हें स्वराज्याच्या कटाच्या भुयारास नेणारें दार आहे. देवळाखालच्या भुयारांत शिवाजी महाराजांनी कटाची उभारणी करण्याची जरूर नव्हती. उषःकाल नंतर कित्येक वर्षांनीं राजवाड्यांच्या एका खंडांत डोंगराच्या दरीतील एका शिवमंदिरांत शिवाजी महाराजांनीं मावळ्यांना स्वराज्याची शपथ घ्यावयास लावली. अशा अर्थाचे कागद छापले गेले. ज्याच्या मंदिराचा उल्लेख आहे तो दासरीश्वर सहज डोंगरावरून हिंडतांना दृष्टीस पडावा, असा मोकळ्या जागीं नाहीं. कटाप्रमाणें महाराजांनीं मावळ्यांना शपथा घ्यावयास लावल्याचें हे संबंध इतिहासांत एकुलतें एकच उदाहरण आहे. परंतु एरवी विचार केल्यास शिवराजांना जमीनीच्या पोटांत शिरून गुप्तपणें कट रचण्याची गरज नव्हती, अशी त्यांची स्थिति नजरेस येते. ते शहाजीसारख्या फार मोठ्या आदिलशाही सरदाराचे पुत्र असून त्याच्या जहागिरींत आपल्या मातुःश्रीसह राहात होते. जहागीर म्हटली कीं, कारकून स्वार शिपाई हत्यारें दारुगोळा, वगैरे गोष्टी जमेस धराव्या लागतात. आजूबाजूच्या पुंडपाळेगारापासून संरक्षण व्हावें म्हणून स्वार शिपायांची वाढ करण्यालाहि सवड होती. महाराजांची आद्य कर्मभूमि राजगड तोरण्याचा खेडेवारें नावांचा परिसर ही असल्याचे प्रसिद्ध आहे. महाराज सिंहगडाच्या पायथ्याजवळच्या शिवापुरास रहात असतील तर खेडेबाऱ्याचा शिवगंगा गुंजवणी या दोन नद्यांचा—डोंगराळ भाग जवळच होता. शिवापुरास महाराजांची वस्ती असल्याचा पुरावा उपलब्ध आहे. अर्थात् तो 'उषःकाला'च्या लेखन प्रसंगीं अज्ञान होता, तरी बखरींतील संदर्भ उपयोगी पडणारे आहेत. अशा रीतीनें 'उषःकाल' कादंबरीचें कथानक तपासूं लागल्यास हरिभाऊंनीं दाखविलेलें वलमीमाचें देऊळ कोठलें या प्रश्नाचें उत्तर सापडत नाहीं. हरिभाऊ युरोपांतील एकाद्या कटाची गोष्ट सांगत आहेत असें वाटूं लागते व त्या गोष्टींचें मूळ प्रयत्न केल्यास इंग्रजी वाङ्मयामध्यें उमगतें.

सूर्योदयाचें कथानक अफझलखानाचें आहे. त्या साठीं वाई, महाबळेश्वराचा व प्रतापगडाचा डोंगर, जावळीचें रान हा प्रदेश प्रामुख्यानें डोळ्यांपुढें येतो. हरिभाऊंनीं डोंगर, दऱ्या, भुयारें यांना आपल्या कथानकामध्यें अवकाश दिलेला आहे. परंतु हीं ठिकाणें

( पान ५६ वर )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






— श्रीराम कामत

## पूर्व कथासूत्र....

निवडणूक जसजशी जवळ येत होती तसतसा गांव जागत होता, अण्णा व भाऊ कुळकर्णी सारखे चेतत होते. इकडे बंडया व भाऊ कुळकर्णी गांवांत कांहींतरी बडबडत होते तर तिकडे अण्णागुरुजी उभा गांव दणाणून टाकीत होते. भाऊच्या घरी धान्य वाटप सुरू होती व त्याबरोबर अख्या गांवांत कंपनीत अपघात झाल्याची वार्ता पसरत होती....ह्या वार्तेने मात्र अण्णा भडकला. त्यादिवशी अण्णा जीव तुटेपर्यंत बोलला. लोकांना तो अद्वातद्वा बोलत सुटला. लोकं मात्र मेंढरासारखीं ऐकत होती. म्हातारा बोलून बोलून थकला होता. तरी तो म्हणत होता. 'निवडणूकींत मला मत म्हणजे या महामायेच्या सोन्याचा कळसाला मत. विसरूं नका...विसरूं नका...!'

आतां पुढें वाचा....

**१७** लोकं विसरलीं नाहींत.

महामायेच्या देवळाला सोन्याचा कळस चढायचा — आणि गांवची लोकं ही गोष्ट विसरतील हें मूळीं, अशक्यच होतं !

होय ! हें वायेचं कार्य होतं. केलंच पाहिजे. हयगय कामाची नाही. वायेचा कोप व्हायचा !

दिवस चांगला कासराभर वर चढला. आणि तशी हाकाटी करीत पोरं टोळक्यांनी गांवांत फिरूं लागलीं. त्यांना आज बरा उद्योग मिळाला होता. घरोघर शिरून लोकांना मतदानासाठीं चावडीवर पिटाळण्याचं काम त्यांच्याकडे होतं. महत्वाचं काम, पोरांनाच जमे. आणि तीं सुद्धां आपखुशीनं तें करीत.

पण आज त्यांना वेगळाच अनुभव येत होता. जावं त्या घरीं लोकं आधीच बाहेर पडलेलीं असत. घरांत मुलांचा धिंगाणा चालू असे. विचारलं कीं तीं जाब करीत, "दादा गेला चावडीवर आणि आयेसुद्धां. मताला."

म्हणजे या स्वयंसेवकांचासुद्धां विरस व्हायचा. पोरांच्या उत्साहावर विरजण पडायचं. त्यांच्या दादागिरीला वाव नव्हता. तोंडाची खाज भागत नव्हती. समाजसेवेची हौस—पण व्यर्थ ! गरजच नव्हती. विरूद्ध पक्षांची दोन टोळकीं समोरासमोर आलीं कीं मग मात्र फैरी झडत, आवाज चढ़त. बोंबाबोंब सुरूं होई. उलटसुलट धमक्या अन् गर्जना चालू होत. एकएक या अशा——

—"अण्णाचा उडाला फन्ना."
—"द्वारक्याला लागला चरका."
—"देवळयाच्या तोंडाला डांबर."
—"अरे बामणाचे मरले शंभर."
—"म्हाताऱ्याला लागली दम्याची ढास."
कमरेच्या पंच्याची सुटली रे कांस."
—"कुळकर्ण्याच्या पोराची केली नरम हड्डी
अरे बघा रे बघा, पिवळी झाली चड्डी." . . . . .

या अशा बोलाचालीवरून प्रकरण हातघाईवरसुद्धां जात होत.

कंपनीचे चारपांच ट्रक गोळेसाहेबानं अण्णागुरुजींच्या दिमतीला दिले होतेच. लोकांना चावडीवर नेऊन सोडण्यासाठीं गांवांतील एकुलत्या एक अरुंद रस्त्यावरुन ते खडखडत फिरत होते. रिकामेच. कारण गांवचीं लोकं आंत चढायला तयार नव्हती. देवकार्याला कोणाचे उपकार त्यांना पसंत नव्हते. तसदी पडली, जरा पाय झिजले तर नुकसान नाही, फायदाच होईल अशी त्यांची भावना होती. शिवाय ट्रकमधून गेलं तर आपण उलट पक्षाचे आहोंत ही गोष्ट बामणांना विनाकारण कळणार. आणि मग नसत्या पंचायती यांत कांही अर्थ नव्हता.

कंपनीच्या रिकाम्या ट्रकाकडे बघून द्वारकानाथ कुळकर्ण्यांच्या पक्षाचीं पोरं मात्र हूर्यो घालीत. ओरडत, "अरे माणसं नाही मिळत तर घाट्यांना तरी चढवा वर. मेढरं तीं. खाणीवर नेऊन उभी गाड़लींत तरी बेंबें करीत तशीच मोफत मरतील. काय ?"

रामप्पा शेट्टी कुठं आजूबाजूला असलाच तर दांत ओठ खात अंगावर उसळे, "साला कोण रे तो ?

त्याला दुरून उत्तर दिलें, "मी बाळासाहेब नावरांचा मधू"
"दाजींचा कान्ता." दुसरा आवाज उठे.
"द्वारकानाथाचा धाकटा भाऊ, गुरू."......

आणि मग मडीमार सुरूं होई. पोरांची आपसांत चढाओढ लागे.
"साला चुप्प ! बकबक बंद करो." मुंबईचा दादा फर्मान सोडायचा. डोळे वटारून आणि हाताच्या मुठी उगारीत ओरडे, "नही तो क्या होगा मालुम आहे ?"



अनुक्रमणिका



"वही होगा जो खुदाको मंजूर होता है !" हा दाजी नाव-राचा कान्ता. कुठं सिनेमांत ऐकलेलं वाक्य वात्रटपणानं तो फेंकून मारी. आणि अशीं वरोबरीचीं पोरं फिदीफिदी हंसत.

"जबान काटूंगा !" रामप्पांची धमकी आणि तिला साजेसा थयथयाट.

"हात्तेरीची !" पोरं हुलकावणी देत.

"खतम् करीन !"

"किंव रे बेटा ? मावाप, भाईवहेन, वच्चाविव्वी सगळीं केलीस खतम् ?" पोरं गिल्ला करीत.

रामप्पाला मग आवर उरत नसे. म्हणजे त्याची सहनशक्ति पार खलास होई. आपल्या थेडगुजरी भाषेंत शेलक्या शिव्यांची लाखोली वाहत तो पोरांच्या मागं लागे. माजलेला वळू कसा वस् वस् तोंडातून फेस काढीत धागर्डधिगा घालून राही: तेवढं मागं शेपूट कमी होत. आणि डोक्याला दोन शिंगं हवीं होतीं.

पोरंच तीं. कसचीं हाताला लागतात. धुम् कुठल्याकुठं पळून जात. एकच कलकलाट, कालवा करीत. आणि दूर जाऊन पुन्हा उचल करीत. ताल धरीत—

"लारीलाप्पा, लारीलाप्पा ! तडीपार रामप्पा

"कंपनीचा हा हुप्पा, तोंडच्या मारी गप्पा".....

दंगा चाललेला दिसला आणि आठवड्याच्या बाजाराला निघालेले कांहीं घाटी रस्त्यांत थांबून बघत उभे राहिले. खर म्हणजे त्यांचा हा स्वभाव नव्हता. कधीं कोणाच्या आगं नाहीं कीं मागं नाही असा त्यांचा पंथ. तो तसा होता म्हणूनच कधीं कोणाच्या मध्यें पडण्याचाहि त्यांच्यावर प्रसंग येत नव्हता. पण आज या घाट्यांना देखील काय बुद्धि आठवली काय कीं ! कदाचित् गांवाकडची आठवण झाली असावी. कसं का असेना, कांहीं क्षण हीं लोकं माणसांत आलीं हें मात्र खरं.

ताजेपणानं खटवून रामप्पाशीं लगट करीत तीं म्हणालीं, "पो-रांची जात. नका लक्ष देऊं तुम्ही. काय—"

"सुव्वर साला ! काय बोलतो रे घाटी ?" रामप्पा गुरगुरला.

"जी दादा ! म्हटलं पोरांवर कां कावलांत ?"

"जा निमूट वाटेनं—" कंपनीचा भाडोत्री गुंड ओरडला.

"जी. निघालोंच !" हा प्रकार दिसला आन् आठवण झाली. तिकडे गांवाकडे एक पाटील होते बघा. नागोजी— नागोजीराव नांव त्याचं. काय ? बरोबर तुमच्याच अंगाचा—" एकजण अंत अंतः-करणांत चांचपडत ओथंबलेल्या आवाजांत म्हणाला.

"छाः ! ह्यांच्या नाही अंगाला येणार." तुच्छतेनं मान हिसडत दुसरा एकजण बोलला, "कुठं पाटील, कुठं हे ? वगऱ्यापुढंच-दिवटी ! आपले नागोजीराव होते बघा ह्या आंब्यापेक्षांस उंचच् उंच गडी."

"जरा जास्तच. ह्या पिंपळा इतका." तिसऱ्यानं डोळे मिटून म्हटलं, "आन् तसाच रुंद, काय ? हाताच्या बुक्कीनं वाघ मारला त्यानं एकदां आणि तें धूड पाठीवर टाकून गांवांत आला तर कोणाला दिसलंच नाहीं. आन् दिसेल तरी कसं म्हणा ? आं ! पाटलाची छातीच ही अशी मक्कम, रुंद. ह्या डोंगरासारखी. एकमात्र होतं. गांवांत पोरासंगं उभा दावा बघा त्याचा. तुमच्या-सारखाच. म्हणजे काय पोरं बघितलीं कीं ह्याचं टाळकं फिरलंच.

"तर दादा, झाली काय गंमत—" पहिल्याची आठवण चिघळली' त्याचा तोच पोट धरून हंसूं लागला. आणि तशीं बरोबरचीं घाटी लोकसुद्धां.





अनुक्रमणिका

"भांचोद, साला चेष्टा करतो काय रे ?" रामप्पा तडकल। नसता तरच आश्चर्य !

"चेष्टा नाही मास्तर– हः हः हः" त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला. "नाही, खंडोबा शपथ नाही. ऐका तर खरं. त्याचं असं झालं बघा दादा—"तो सांगूं लागला. आणि पुढचं वाक्य हंसण्यांतच उडालं.

तसं आणखीं एकानं तोंड घातलं, "आपले पाटील, म्हणजे हे नागोजीराव एक दिवस वसले होते शेतांत. तर कसं न् काय गांवच्या पोरांनीं हें टेळलं. नाहीतरी कावळ्यांची नजर त्यांची आन् वघूनशानी गप्प जातील तर पोरं हो कसलीं ? धांवली भराभर उड्या टाकीत. कसली गडवड म्हणून पाटील आपलं मान उंचावून वघतो तर समोर वांयावर वानरसेना. आणि दादा, आमच्या पाटलाला मग काय विचार उरला म्हणतां ? टेंपरेचर डोचक्यांतून शाप चढलं. तांव्या टाकला तिकडेच आन् वोंवा ठोकत उठला. तसाच लागला पोरांच्या पाठीमागं. तर काय ? गांवांत मोफत तमाशा केलान् वघा. पोरं पुढं, मागनं पाटील– धांवतायत. धोतराला कांससुद्धां घातली नाही त्यानं. आं ! तर आतां काय वोलणार ? नाहीं म्हणजे दादा तुम्हीच वोला..."

दादा खरा, पण रामप्पासुद्धां माणूसच होता. तो काय वोलणार? आणि वोलण्यासारखं होतंच कुठं कांहीं ! 'तिच्या आयला–' असं पुटपुटत तोसुद्धां जोरजोरानं हंसत सुटला.

हंसताहंसता रामप्पा गप्पकन् थांवला. उशीर का होईना, पण त्याच्या आतां ध्यानांत आलं. म्हणजे ही आपलीच थट्टा आहे, मस्करी आहे. आणि एकदां मनांत यायची खोटी. तो एकदम गरम झाला. डोळे फिरवून घाटयांवर धांवून गेला. लाथाबुक्क्यांनीं त्यांना मारीत सुटला. तोंड चाललंच होतं, "साली गद्धेकी औलाद ! थांवा थोबाडच फोडतों. कायमचीं वंद करतों. मुडदे पाडतों."

आणि तेहि लाचार, दुवळे जीव गयावया करीत मार खात होते. हातापाया पडून रामप्पाची विनवणी करीत होते, "माफ कर दादा ! गुन्हा झाला."

माणसासारखे हंसले हा त्यांचा मोठाच गुन्हा होता. त्यावद्दल रडल्याखेरीज आतां त्यांची सुटका नव्हती....

चावडीवर सरपंच वाळ्या सुतार गर्दीला शांत रहाण्यावद्दल पुन्हा न् पुन्हा सूचना देत होता.

पण लोकंच त्याला उलट दम देत होतीं. तें तोंड वंद कर आणि काम चालू कर असं वजावीत होतीं.

नाहीतरी मतदान सुरूं करायला आतां हरकत नव्हती. चावडीवर तरी चारपांचशें लोकांची गर्दी होती. म्हणजे मताचा हक्क असणारी गांवांतील बहुतेक सगळी मंडळी हजर होती. आणि तरीहि हा सरपंच लोकांची वाट वघत होता.

असा कांहीं वेळ गेला. वाहेर गलवला वाढतच चालला होता. रस्त्यावर दाजी नावर सहकुटुंव येतांना दिसला मात्र आणि काय असेल तें असो गर्दीचा गलका एकदम शांत झाला. सर्वांचीच जणुं वाचा वसली अशी थंड निस्तब्धता पसरली. वाजल्या फक्त दाजीच्या पायांतील वहाणा—कार्रकुर्र ! आवाज निघाला एक आतेवाईच्या तोंडून. गर्दीकडे वघत तिनं हंसून विचारलं, "मताला काय रे ?"

तिला जाव दिला दाजीनं, हंसतंच. "मग आणखी कशाला ? तुझ्यासारखेच ते मतदार."

"जोर चढेल आतां." आतेवाईनं फणकाऱ्यानं म्हटलं, "गांवचीं लोक वघितलीं, कीं जळ्ळी वायकोसुद्धां नाही दिसणार."

दाजीला वघून सरपंच अधिकच गोंधळला. मांवावल्यासारखा झाला. वसल्या खूर्चीवरून उठत तो ओरडला, "दाजीं तूं ?"

दाजी वोलला, "म्हणजे ? सरपंचा, अरे मत हा माझा हक्क. तें देणं हें कर्तव्य. आणि या दोन गोष्टी विसरलों तर भारताचा नागरिक म्हणून घेण्याचा मला अधिकार नाहीं. लोकशाहीचीं पथ्यं आहेत वावा हीं ."

"आहे ठाऊक मोठा विद्वान आहेस." भाऊ कुळकर्ण्यानं हळूच नांगी मारली. "म्हणून तर राजिनामा दिलास."

गुणाजी नाडकर्ण्यानं सरपंचाला डोळा घातला आणि निवडणुकीचं कामकाज सुरूं करण्यावद्दल सूचना दिली. बाळ्या सुतार गर्दी वघून आधीच वावरला होता. त्यांत निवडणुकीची ही जबाबदारी. लटपटत्या पायांनी तो उभा राहिला. कापऱ्या स्वरांत बोलूं लागला, "लोकहो, दाजीं नावरानं राजिनामा दिल्यामूळं आज हा नसता प्रसंग आपल्यावर आला आहे. फुकट तुम्हाला तसदी आणि सरपंच म्हणून मला पंचायती. काय ? आतां ह्या दर्जाच्या तोडीचा लायक माणूस ह्या गांवांतच काय, पण नऊ खंड पृथ्वींत तरी

**दौऱ्याची कमाई**



**एम. सी. सी. ने या दौऱ्यावर स्वतःचें "अन्न" आणलें होतें—भारतावर न विसंबतां ····**

दुसरा सांपडणार आहे होय ? सांगा, तुम्हीच सांगा...'

सरपंचाच्या ह्या वाक्याला जाम टाळ्या पडल्या. बाळ्या मुतार कसं अगदीं लोकांच्या मनांतलं बोलला होता. शहाणा असो खुळा असो, कसाहि असला तरी दाजी तो दाजीच. त्याची सर कांहीं दुसऱ्या कोणाला येणार नव्हती. निदान लोकांची तरी अजून तशी श्रद्धा होती. गांवांनं चारपांचशें तोंडानं मुळीं निकालच दिला, "सरपंचा, बरोबर बोललास रे बाबा !"

सरपंचाला आणखीहि खूप बोलायचं होतं. पण अण्णागुरुजींनं हरकत घेतली. तणतणत म्हटलं, "सुतारा, लोकं जमलींत निवड-णुकीला. तुझं हें लेक्चर नको."

"म्हातारा घाईला आलाय् रे !" माऊ कुळकर्ण्यांनं फाजील-पणानं म्हटलं. आणि तशीं गांवातील वडीं येंड खो....खो....हंसत सुटलीं.

"तूं-तूं ब–बोलूं नकोस. क–कारण नाहीं." अण्णागुरुजी उसळला. संतापानं त्याचा थरकांप उडाला होता. तोंडून धड शब्द कांहीं फुटेना. "फु-फुकट अपशकुन."

"अरे बरा ! काय ? गांवाचं कल्याण होईल ! होय–"
शांतपणं माऊनं जाब केला.

हा तंटा आतां चांगलाच जुंपणार, तर बाळ्या मुताराला आपल्या जबाबदारीची आठवण झाली. कासाविशीनं तो परखड आवाजांत ओरडला, "अरे, क्याचा तरी विचार करा. काय ? आणि तो नसला तर सरळ बाहेर व्हा. हियं काम नाही तुमचं. इलेक्शण चाललंय् हियं, हां ! लोक हो, दाजीच्या जागेसाठीं माणसाला निवडून देण्यासाठीं जमलों आहोत आपण. तर लायक उमेदवारांची नांवं सुचविण्याची तुम्हाला मी विनंती करतों.'

बाळ्या नावर तयार होताच. तो ताडकन् उभा राहिला. हातांत चिटोरं. तो मजकूर त्यानं वाचून दाखवला. 'आं-आं' करीत तरी दोनचार ठिकाणीं अडखळत. वहिवाटीप्रमाणं ग्रामपंचायतीची ही रिकामी जागा ब्राह्मणांसाठीं राखीव जागा आहे. म्हणून या जागे-साठीं गांवांतील ब्राह्मणमंडळींच्या वतीनं मी रा. रा. द्वारकानाथ वासुदेव कुळकर्णी यांचं नांव सुचवतों."

वसंत वापलानं अनुमोदन दिलं. आणि मग सरपंचानं द्वारका-नाथाचं नांव दफ्तरीं दाखल केलं.

अर्थात हें सर्व अपेक्षित होतं. गर्दीला सुखदुःख नव्हतं.

तें होतं आतां पुढं. प्रत्येकाचे कान अन् डोळे पुढं आतां काय होतं इकडे लागून राहिले होते. बघण्यासारखं आणि ऐकण्यासारखं कांहीं घडणार असलं तर तें आतां– अण्णागुरुजींचं नांव सुचविल्या-वर. तें कोण न् कसं सुचवतो हें बाकी बघायचं. आणि मग हीं बामणं काय दंगा करतील एक देवालाच ठाऊक !

माऊ कुळकर्णी छातीवर हात घेऊन ठोके मोजीत होता. बाळ्या नाबर वर्तमानपत्रानं त्याला वारा घाली. आजूबाजूच्या लोकांना ऐकूं जावं इतक्या जोरानं पुटपुटत होता, "तरी ह्या माऊला मी बजावलं होतं कीं बाबा तुझी छाती खराब. नको येऊंस. मांचोद, काय नेम ? गांवांत लोकांना नाही किंमत राहिली आपली.

म्हणून तर हें निवडणूकीचं खूळ निघालं. पण ह्याला वाटतं गांवचीं लोकं हंसत नाहींत. निदान समक्ष तरी तीं विरुद्ध जाणार नाहीत. आणि गेलीं तर त्या धक्यानं हार्टफेल झाला तरी चालेल. नाहींतरी मग जगायचं कशाला ?..."

वसंत बापाला तर चक्क दुकानांतील खातेवहीच उघडून बसला होता. अण्णागुरुजीच्या पुढंपुढं करणाऱ्या लोकांना नजरेच्या फटकाऱ्यानं अस्वस्थ करीत तो स्वतःशींच बटबडत होता, "बाकी बरीच थकलीय् बुवा."

वंड्या नावर खास खादी पोशाखांत हजर होता. हातांत वेताची छडी, पायांत काळें मिलिटरी बूट, हिंस्र श्वापदासारखा तो येराझारा घालीत होता. आणि उगाच अधूनमधून डरकाळ्या फोडत होता.

एकूण बामणांची जय्यत तयारी होती तर–

म्हणजे अण्णागुरुजींचा मगतगणसुद्धां गडबडला. मारे चंग बांधून ते आले होते. प्रत्यक्ष प्रसंग आला तशी मात्र एकेकाचा आवाज बंद झाला. कोणाला भाऊच्या काळजाची खात्री वाटेना. कोणाला वसंत बापलाची लाल चोपडी मोवूं लागली. वंड्याचा दहशत तर प्रत्येकालाच होती. तर काय सर्वांचीच अशी दांतखीळ बसली. कोणीच पुढं होईना. उठून अण्णागुरुजींचं नांव सुचवायला धजेना.

सरपंच आपला अपेक्षनं अण्णागुरुजीकडे बघत होता.

आणि तो म्हातारा अपेक्षाभंगानं दगड झाला होता. डोळ्यांत जीव नाही, चेहऱ्यावर भाव नाही, आवाज नाही, हालचाल नाही. तो हवालदिल झाला होता. ज्यांनी हवाला दिला त्यांनीच अण्णाचा निकाल लावला होता. चावडीवर, चारचौघांत त्याला एकटा पाडला होता, उघडा पाडला होता.

अखेर बाळ्या सुतारानंच म्हटलं, "काय रे अण्णा तुझ्या बाजूचं कोण नाही दिसत ?"

काय-बोलणार म्हातारा ? जाब द्यायला त्याला तोंड होतं कुठं ? आणि होतं तें उघडत नव्हतं. टाळं लागलं होतं त्याला. आणि चावी हरवली होती.

अण्णागुरुजीची ही अवघड अवस्था दाजी नावराला बघवेना आंब्याचा हा टाळ ताडकन उठला. भरल्या आवाजांत म्हणाला, "ग्रामपंचायतीच्या रिकाम्या जागेसाठीं मी गंगाराम गुणाजी रेडकर उर्फ आपले अण्णागुरुजी यांचं नांव सुचवतो."

"अहो—अहो, तुम्ही नका मध्यं पडूं. सांगून ठेवते–" दूर कोपऱ्यांतून आतेबाई नवऱ्याच्या अंगावर ओरडली.

"आणि मी सांगतों, आहे–कारण आहे." दाजी तावातावानं म्हणाला, "अण्णा अडचणींत आहे. अहो, ह्या वाघाला बामणांनी जाळींत पकडला."

"आणि मडव्या तूं कोण रे ?" बाळ्या नावर. कडाडला

"भाऊ तुझा. म्हणून तर फायदा. माझं तोंड तुम्हीं बंद करूं शकत नाही."

"आतेबाई, दाजीशी बोलण्यांत अर्थ नाही. तेव्हां तुला सांगतों. शहाणी असशील तर तुझ्या नवऱ्याला आवर." भाऊ कुळकर्ण्यानं खास पट्टींतला आवाज काढला. त्याचं डोक्याचं टक्कल लालबुंद झालं होतं. छातीवरचा हात त्वेषानं टेबलावर आपटला.

"काय करशील रे ? आं–" दाजीनं विचारलं.

"बहिष्कार घालूं, वाळींत टाकूं, जातींतून उठवूं" भाऊचा आवाज चढत होता. धमक्या वाढत होत्या. आतेबाई विचार कर. दाजीला तो नाही तो बैल आहे–"

"हूं ! विचार तो काय करायचा, कुळकर्णीमामाजी ?" आतेबाईनं उसंबळून म्हटलं. बैलामागनं गाडी, ओढील तिकडे जायचं. तुम्ही मात्र विचार करा ! यांना वाळींत टाकून जातीचं नांव वाढणार नाही, कमी होईल."

आणि ती पुढं झाली. पदराचा लफ्फेदार शेव सांवरीत, नाकांतील नथ झोकांत तोलत. सरपंचाकडे बघून आतेबाईनं हंसत सांगितलं, "सुतारा, यांच्या सुचनेला माझा–जळ्ळा काय म्हणतात तो–टेकू आहे."

चावडीवर एकच हंशा पिकला. त्यांतच अण्णागुरुजीच्या लोकांना आतां जोर चढला. कोंडवाड्याच्या दार उघडं बघून बाहेर पडण्यासाठीं अजापुत्रांनी दंगल उडवावी तशी ही मंडळी कालवा करीत उठली, "अण्णाला माझा पाठिंबा आहे." "अरे माझा पण." "होय, माझा सुद्धां."

त्यांच्यावर बाळ्या सुतार एकदम तडकला, "चुप्प ! आधीं हा ओरडा बंद करा ! मांचोद, प्रसंगाला शेपूट घालतील आणि तो निभावला कीं मग पराक्रम बघावा. थू तुमची !"

आणि मग मतदान सुरू झालं तरी सरपंचाचं तोंड सारख वाजतच होतं. नाहीतरी आज दिवस त्याचाच होता.

अण्णागुरुजीला मात्र वाचा फुटत नव्हती. आणि डोळ्यांतून टिपं गळतंच होती.

तासा भरानं हमसाहमशी रडत कान्ता घरीं आला. त्याचं तोंड उतरलं होतं कपडे धुळींत माखले होते. शर्ट फाटला होता. बरोबरच्या पोरांशीं तंटा करून आणि मार खाऊन तो परतला होता.

दुसरं काय करणार ? त्याचा नाइलाज होता, निरुपाय होता. भाऊ कुळकर्ण्यानं त्याच्या दाजीला धमकीच दिली होती. पण हें कळलं मात्र आणि बामणांच्या पोरांनी कान्ताला वाळींत टाकलं, त्याला तीं बरोबर येऊं देईनांत, आपल्यांत फिरूं अन् मिसळूं देईनांत, एका एकीं उलट फिरलीं. माणसाचा विटाळ आलेल्या पिलाला कावळीं बोचून खातात तशीं तुटून पडलीं. दाजीच्या नांवानं शंख करीत त्याच्या ह्या लेकाच्या मागं तीं लागलीं. घासून पाहून बोलत होतीं. कर्मंन वर्मं काढीत होतीं. कान्ताला पुन्हा न् पुन्हा बजावींत होतीं कीं आजपासून तूं बामण नाहीस. जातीनं तुमच्यावर बहिष्कार टाकला आहे. आतां तुम्हाला जात नाही राहिली. महारामांगाहून तुम्हीं क्षूद्र, नीच.

आतां इतकं झाल्यावर कान्तानं निमूट घरचा रस्ता धरावा कीं नाहीं ! पण मग दाजी नावराचा तो लेक कसला ? बापाचा गुण पोरांत थोडा उतरलेला. तो गेला आपली अक्कल पाजळायला. मान हलवीत मारे शहाणपणा शिकवूं लागला म्हणाला, "जात जन्माची असते बाबा. एखाद्याला वाळींत टाकल्यानं तो जातींतून उठत

अनुक्रमणिका






नाहीं. वामण म्हणून जन्माला आलेला मरेपर्यंत बामणच रहाणार. ठाऊक नसलं तर जा विचारा कोणाला तरी !"

"तूं नको सांगूस. आम्ही नाही ऐकणार." भाऊ कुळकर्ण्याचं घाकटं कारटं म्हणालं, "तुमच्या हातचं पाणीसुद्धां चालणार नाही आतां आम्हाला."

"जातींत एखादं कार्य निघालं कीं तुम्हाला यापुढं आमंत्रण वंद. तुमच्या कार्याला पण कोणी येणार नाही." दुसरं एक पोरग हुशारी करूं लागलं.

त्याच्या वाळचाकाकाचा मध्या तर आणखीहि पुढं गेला. म्हणाला, "कान्त्या, लेका यापुढं तुमचं आम्हाला सोयरसुतक उरलं नाही. सांगून ठेवतों. तुझ्या घरांत कोणी मेलं तर खांदा द्यायला-देखील आम्ही येणार नाही. आणि उद्यां त्या वच्छीचं लगिन निघालं—पण होय कीं ! जातींत आतां कोण नवरा मिळणार आहे तिला ?"

"पण जातींतला नवरा वच्छीला नकोच आहे." गुरु कुळकर्ण्यानं डोळा मारीत हंसून म्हटलं.

"म्हणजे ? गुरु म्हणतोस काय ?" कुणीसं विचारलं.

तसं भाऊ कुळकर्ण्याचं तें शेंडेफळ दोन्ही हात कमरेवर घेऊन खदखदून हंसलं. म्हणालं, "लेको, असतां कुठं रे ? गांवांत की रानांत ?"

"आं ! म्हणजे गांवातच." पोरांनी सांगितलं.

"मग उद्यांपासून जरा रानांत भटका. सांजच्या टायमाला. खाणीसुटल्यावर." गुरुनाथ मिटक्या मारीत सांगू लागला, "एकएक काय गंमत चालते रे—"

वाकीच्या पोरांची उत्सुकता एव्हाना शिगेला गेलेली. गंमतीची त्यांना थोडीफार कल्पना करतां येत होती. त्यांच्या कुतुहलाचा विषय फक्त होता—तो कोण ?

गुरु कुळकर्णी भाव खात म्हणाला, "जवळ या, कानांत सांगतों."

तसा पोरांनीं त्याला गराडाच दिला. आणि मग गुरुनं नांव सांगितलं. जरा मोठ्यानंच. कान्तालाहि ऐकूं जावं म्हणून.

मग मात्र कान्ताचा निरुपाय झाला. म्हणजे ऐकून आतां गुप्त वसून चालण्यासारखं नव्हतं. घराण्याची अब्रू, वहिणीचं नांव—ती टारगट पोर उघड उघड त्याच्या तोंडावर वोलत होतीं नाही. हद्द झाली होती; शिकस्त झाली होती अगदीं. आतां मुर्दाडासारखं निमूट वसणं पाप होतं. वहिणीच्या नांवाचं आणि घराण्याच्या अब्रूचं रक्षण करणं त्याचं कर्तव्य होतं. जीव गेलातरी बेहेत्तर—होय ! कान्ताच्या काळजाचं वर्फ झालं. शरीर थंडी भरून शिरशिरलं. पाय लटलट कापूं लागले. कानशिलं उडूं लागली. खळनाथाचं नांव घेऊन गुरु कुळकर्ण्याच्या अंगावर तो वेडावांकडा धांवून गेला.

पण मारामारीची त्याला संवय नव्हती. अभ्यासांत हुपार खरा. पण या विषयांत कान्ता बिलकुल कच्चा होता. दाजीची शिकवणच नडली. या अशा भानगडींत बापानं लेकाला कधीं भागच घेऊं दिला नव्हता. सक्त ताकीद होती कीं— मार खा. मेलास तरी चालेल. पण मारामारी करायची नाहीं.

कान्तानं मारच खाल्ला. बरोबरच्या पोरांनी त्याला चांगलाच तुडवला. मातींत लोळवला. केसांना धरून डोकं आणि पाठ खालीं जमिनीवर आदळली. तोंडांत धूळ घातली. पाटलोणीच्या खिशांत दगड भरले.

आणखीहि विटंबना करणार होतीं. पण कांहीं वाटी लोकं बाजाराहून परतलीं होतीं त्यांनी कान्ताची ओरड ऐकली. आणि तीं मध्यं पडलीं. वाकीच्या पोरांना बाजूला करून कान्ताला त्यांनी सोडवलं . . . . .

पायरीवरूनच काळीज ओरबाडीत कान्ता ओरडला, "जातीनं आपल्याला वाळींत टाकलंय् ग ताई"

पण वासंती पुढं धांवली नाही. ऐकलंच नसावं तिनं. ती बहुधा घरकामांत गर्क असावी.

फाटक्या शर्टानं तोंड पुशीत कान्ता घरांत शिरला.

आणि माजघरांतच थांबला. खिळून, खळवळून.

दाजीच्या खोलींत खिडकीपाशीं वासंती उभी होती. एकटी नाहीं. तो —होय, गुरु कुळकर्ण्यानं ज्याचं नांव घेतलं होतं तोच—विजय शिर्के ! वासंती त्याच्या मिठींत पार मुरावली होती. स्वत:ला आणि स्वत:च्या लोकांना विसरून नि:संग विसावली होती. लवलवत, मुसमुसत त्याला बिलगली होती. त्याच्या छातीवर तिनं डोकं टेकलं होतं. तिच्या केसांतील सोनचाफ्याचा तो—एक मावणीचा पोर वास घेत होता.



अनुक्रमणिका

खरं होतं ! गुरुनाथ कुळकर्ण्याचं खरं होतं तर—

तें खोटं आणि खोडसाळ आहे या फाजील खात्रीनं कान्ता इतक्या पोरांच्या अंगावर तुटून पडला होता. कर्तव्यासाठीं मरणार होता तो, मरत होता, आणि मार खाऊन हा असा पराभूत आणि जखमी अंतःकरणानं घरीं परतला होता. एकच समाधान होतं— फक्त तेव्हढं एकच कीं कर्तव्यांत तो चुकला नव्हता, डरला नव्हता, मागं फिरला नव्हता.

पण हें समाधान सुद्धां कान्ताला मिळायचं नव्हतं. त्याच्या कर्तव्यानं त्याला सोडलं नव्हतं. फक्त तें उलट फिरलं होतं. हें असं. सुरस अन् चमत्कारिक अरबी गोष्टींतील वाटलींतल्या राक्षसासारखं. बूच निघतांच मुक्त होऊन त्याचं हें कर्तव्य वाढत वाढत जाऊन आकाशापर्यंत भिडलं होतं. आणि उन्मत्तपणं हंसत अक्राळविक्राळ जबडा पसरून कान्तालाच गिळण्यासाठीं समोर उभं ठाकलं होतं.

अजब होतं, चमत्कार होता. भयचकित नजरेनं तो बघतच होता. स्तंभित होऊन. निर्जीव, रक्तमासांचा नुसता गोळा ! आणि . . . आणि त्याचं डोकं गरगरूं लागलं. पायाखालची जमीन सरकूं लागली फुग्यासारखा हलका होऊन तो आकाशांत उंच उडाला. हलक् झलक् कुठंतरी पोकळींत विरत न् जिरत चालला.

"ताई वाटोळं केलंस ग ! सगळ्या—सगळ्याचं – " कान्तानं हंबरडा फोडला.

पुढच्याचक्षणीं डोळे फिरवून आणि हाताच्या मुठी वळवून धाडकन् तो चक्कर येऊन खालीं पडला.

वासंती भलतीच दचकली. विजयाला झटक्यानं दूर लोटून ती बाजूला झाली. थरथर कांपत पुटपुटली. गदमरून. "अरेदेव कान्ता ! म्हणजे—म्हणजे पाहिलं वाटतं त्यानं ?"

"भग घाबरायला काय झालं इतकं ?" विजय तिला धीर देत म्हणाला. पण त्याचाहि आवाज पडला होता.

"झालं कर्म ! तुझं न् माझं !" वासन्तीचं चित्त ठिकाणावर नव्हतं. ती कांहींतरीच बोलूं लागली,—"ठाऊक आहे ? जीव देण्या खेरीज आत्तां उपाय नाहीं मला."

जरा उशीराच असेल ! वासंतीच्या तें लक्षांत आलं. कान्ता माजघरांत पडला आहे. चक्कर येऊन. आणि ती वेधडक तिकडे धांवली.

"अरे चक्कर आलीय् याला" आणि पाणी आणण्यासाठीं ती आंत स्वैंयंपाकखोलींत धांवली.

पाण्याचा तांब्या घेऊन वासंती बाहेर आली तेव्हां विजय कान्ताची पाऊलं चोळत होता. त्याला ती बोलली, "तूं जा बघूं आधीं."

विजयला तें आवडलं नाहीं. नाराजीनं त्यानं विचारलं, "म्हणजे?"

"जरा ऐक माझं. हा शुद्धीवर आला आणि तूं समोर दिसलास कीं मग—मग ?"

"पळून जायला चोर नाही म्हटलं मी." विजय कडवटपणं म्हणाला.

एकदम काकुळतीस येत वासंती म्हणाली, "असं काय करतोस रे ? जा ना ! नीघ, पळ इथला."

आणि सरळ हाताला धरून तिनं त्याला बाहेर लोटलंच.

थोडया वेळानं कान्ता सावध झाला. त्यानं डोळे उघडून पाहिलं. त्याच्या कपाळावरून प्रेमानं हात फिरवीत वासंतीनं विचारलं, "कान्ता, बरं वाटलं ?"

"गेला तो ?—"

"कोण रे ? आई अन् दाजी गेलींत चावडीवर. एकटी मीच आहे घरांत." वासंतीनं हंसून सांगितलं.

यावर शुष्क कोरडेपणानं कान्ता म्हणाला, "म्हणून—म्हणून आला होता वान्या ? तो—भावणीचा पोर, विजय."

"शुद्धीवर आहेस का कांत्या ?" वासंती एकदम उसळली फणफणत म्हणाली, "लाज नाहीं वडील बहिणीला वाटेल तें बोलायला ?"

"पण मी पाहिलाय त्याला. ह्या डोळयांनी. रवळनाथाची शपथ —"

"तूं बघणार काय ? पडला होतास मेल्या चकूर येऊन. आवाज कसला म्हणून दचकून बाहेर धांवले मी स्वैंपाक खोलींतून, बघतें तर तूं माजघरांत पडलेला."

"पण—पण मी पाहिलंय् ग—तुम्हां दोघांना . . . दाजीच्या खोलींत . . . खिडकीपाशीं."

"हा तांब्या घालीन हं टाळक्यांत, कान्त्या ?" वासंतीनं भडकून सांगितलं. "भाऊ म्हणूनहि नाही बघणार. उन्हातान्हांत भटकून असा. डोकं फिरवून घरीं ये आणि कांहीतरी फाजील बैंस बोलत बहिणीला."

"म्हणजे मी पाहिलं तें खरं नव्हतं तर—" कान्ताला कोडं पडलं, चलबिचल झाली. खात्री राहिली नाही.

"खोटं, खोटं, त्रिवार खोटं !" वासंतीनं निर्वाळा दिला.

"मग तो भास होता—भासच—"

"कान्त्या—" वासंतीनं भरला तांब्या त्याच्या डोक्यावर ओतला.

"तायडया, हें काय ?"

"आलास का ठिकाणावर ?"

"शपथ आहे माझी, दाजींना नको सांगूस, आईलासुद्धां."

"एकदा सोडतें. पुन्हा असं भलतंच बोललास तर—तर मात्र जीवच देईन बघ." वासंतीनं बजावलं.

"नाही ग ताई ! कधीं, कधींच नाही." कान्ता साफ विरघळला.

"गुरु कुळकर्णी बोलला—"

"कां ऐकून घेतलंस ?"

"नाही ऐकून घेतलं. मारामारी केली ना ! जाम मारलं ग साल्यांनी." कान्तानं शरमेनं मान खाली घातली.

आणि वासंतीचे डोळे भरून आले. गळा दाटून आला. रुखरुख लागली. काळजांत काहूर भरून राहिलं. [ क्रमशः ]

•••



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# एका (न) उदित लेखकाची गोष्ट

—भालचंद्र सुळे

"वासुदेव चिंतामणी देशपांडे यांची शंभरावी कादंबरी नुकतीच प्रसिद्ध झाली. त्याप्रित्यर्थ आजचा हा सत्कार समारंभ घडवून आणण्यांत येत आहे. वाचिदेंची मी नव्याने ओळख करून द्यायला हवी असं मला वाटत नाही. घरोघरी लहानापासून थोरांपर्यंत त्यांची पुस्तकें आवडीनें वाचली जातात. आज हजारोंच्या संख्येनें हजर असलेला वाचकवर्ग, त्यांची लोकप्रियता सिद्ध करीत आहे. आणि त्यांची शंभरावी कादंबरी त्यांचे प्रतिभा साधन सिद्ध करीत आहे. मी सत्कार-समितीतर्फे व वाचकवर्गातर्फे वाचिदेंना हा पुष्पहार अर्पण करीत आहे. "टाळयांच्या गजरांत मी हाराचा स्वीकार केला. नि मग एका पाठोपाठ असंख्य हार माझ्या गळयांत पडले. हारांचे ओझे सांभाळीत मी सत्कारास उत्तरादाखल चार शब्द बोलण्याकरतां उठलो. परत एकदां टाळयांचा गजर झाला. अशावेळी मोठे लोक काय करतात ते मला आठवले. माझ्याकडील हारांतलें एकदोन हार समोरच बसलेल्या कांहीं 'गोड', वाचकांच्या दिशेनें मी नेम धरून फेकलें आणि 'हाऽऽय!' शेजारच्या खुर्चीत बसलेल्या माझ्या सौभाग्यवतीनें माझ्या पार्श्वमध्यतनुवर एक सणसणीत चिमटा काढला. ती बरोबर आहे हे मी विसरलोच होतो. वेडावाकडा चेहरा करीत मी वेदना सहन करण्याचा प्रयत्न केला. लोकं मात्र हंसत होते. वाचिदे लिहितात तसें वागण्यांतहि विनोदी आहेत असे म्हणत होते. शक्यतो गंभीर चेहरा करून मी बोलण्यास सुरवांत केली. 'अध्यक्ष महाशय आणि वाचकहो, आजचा हा प्रसंग.........'

हा प्रसंग! हा प्रसंग खरोखरीच सत्य स्वरूपांत उतरला असतां! परंतु आज सकाळीच माझ्यावर आलेला (अति) प्रसंग टळला म्हणून बरें! नाहींतर नाइलाजानें मला लेखक व्हावे लागलें असतें, माझी शंभरावी कादंबरी प्रसिद्ध झाली असती.







अनुक्रमणिका

माझा सत्कार–समारंभ झाला असता – नि वाचकहो, तुमची खैर नव्हती. कधी नव्हे तो आज मी सकाळी लवकर उठलो होतो. कालच पाहिलेल्या एका हिंदी सिनेमांतले गाणे 'घनःशाम सुन्दराच्या चालीवर म्हणत होतो. कालच्या रमीच्या डावांतले प्लस-मायनस आंकडे आठवत होतो. आणि आयुष्यांत प्रथमच मी प्लस पांच होतो या आनंदाने सुखावत होतो. इतक्यांत "ऐकलं कां ?" अहाहा, म्हटलं आजचा दिवस फारच चांगला दिसतोय. तमाम ( गरीब बिचाऱ्या ) नवरे मंडळींनों, मला नाहीं वाटत हा प्रश्न कोठून आला हे तुम्हाला समजले नसेल असे. अंगावरील पांघरूण उडवून देऊन 'ऐकण्याकरितां' स्वयंपाक घराच्या दिशेनें धांव घेणं भाग होतंच.

"तुम्हाला अगदीच कसं हो हे नाही ?" ( अर्थात 'हे' म्हणजे अक्कल हे वेगळे सांगणे नलगे. ) हा प्रश्न दिवसांकाठीं अनेकवेळां मला विचारला जातो. त्यामुळें तो माझ्या इतका अंगवळणी पडला आहे कीं, उभ्या राहिलेल्या माणसाला जाणाऱ्या येणाऱ्यांनी विचारलेल्या, 'काय उभे आहांत काय ?' अशा प्रश्नांपैकी वाटतो. म्हणून या नेहमीच्या प्रश्नावर मी नेहमी नुसती चुळबुळ करतो. कपाळावर नसलेला घाम उगाचच पुसतो.

"अहो, घाम कसला पुसताय सकाळीच ? काल काय झालं, आमच्या क्लबमध्यें मिसेस् वैद्य आहेत नं ?......"

"मला काय माहित ?"

"च् – च् – ऐकून तरी घ्या मुकाट्यानें ! तर त्या मिसेस् वैद्य म्हणत होत्या कीं, त्यांचे मिस्टर म्हणे लेखक आहेत. त्यांचे लेख येतात म्हणे छापून !"

"हो कां ? हं..हं !"

"पैसे पण मिळतात म्हणे !"

"छान !"

"बाई, बाई; कमाल आहे तुमची ! आमचं मेलं नशीबच खोटं. आमचं असं सांगायला कांहींच नाहीं चार बायकांत !"

"अग, मग सांगायचस कीं आमचे हे.."

"सांगितलं हो. मी काय दाद देते त्या वैद्यीणीला ?"

"सांगितलंस नां मी पते खेळण्यांत पटाईत आहे म्हणून ? अग सुमा, कालतर मी प्लस पांच होतो."

"चुलींत घाला तुमचे पते ! मी तिला सांगितलं, म्हटलं एवढी नको हो फुशारकी मारायला मिसेस् वैद्य. आमचे हे पण लिहितात बरं ! तुमचे मिस्टर जरी बी. एस्. सी. असले तरी आमचे हे कांहीं कमी नाहीत. चांगले अंडरग्रॅज्वेट आहेत आर्टस्चे !"

यावर मी नुसती कॉलर चाचपली.

"खरंच गडे, लिहा ना तुम्हीं पण लेख. लिहाल ना ? अं ?"

"मी ??"

"जळ्ळं पैशाचं जाऊं दे हो, उलटे आपणच पाठवून देऊं पांच दहा रुपये त्या संपादकांना, पण मेलं नांव तरी येईल छापून चांगलं ! मग लिहितां ना ?'"

आता मात्र मी थंड उभा राहिलो. भर पावसांतहि उभ्या असलेल्या फोटोंतल्या बाबाजीच्या पुतळ्यासारखा–मख्ख चेहऱ्यानें ! तसे लहानमोठे धक्के ही मला अधून मधून देते. ही आहे कॉलनींतील 'महिलोद्धार मंडळा'ची समासद. मंडळाचं सुटसुटीत नांव क्लब ! बरं, या मंडळाचं कार्य काय ? तर म्हणे अखिल भारतीय महिलोद्धार ! (अथवा कॉलनींतील कुचाळक्या किंवा आपसांत मोठेपणाच्या स्पर्धा !) नि मग त्या कार्याला अनुसरून ही माझ्याकडे असली कांहीं कार्य आणते. त्यामुळें मला आतां असं वाटतंय कीं, माणसाचं मन शॉकप्रूफ करण्याची कांहीं सोय होईल तर फार बरं होईल. हा धक्का खरोखरीच माझ्या सहनशक्ती पलीकडचा होता. एकवेळ तिनें मला येऊन सांगितले असतें कीं, मिसेस् वैद्यनी 'झनक झनक हार' आणलाय तसलाच मला आणा. तर थोडी कां कूं करीत कां होईना पण मी तो आणला असतां. पण मी आणि लेखक ? मला कल्पनाच करवत नव्हती. पण हिच्या डोक्यांत ही कल्पना यायला कारण म्हणजे मिस्टर वैद्यांचं नांव पेपरांत छापून येणार नि माझं मात्र नाही. काय करायचंय नांव छापून येऊन ? पण एवढं मात्र खरं कीं, मी जितका प्रसिद्धी पराङ्मुख (कारण प्रसिद्धीची या जन्मांत

*मी लेखक व्हावं म्हणून बायको*
*सारखी पाठीमागे लागली*
*होती. मी कागद घेऊन लिहायला*
*बसलो. पण छे....कसलं जमतं*
*ते....म्हणून कसा तरी*
*घरी आलो....बघतो....तो*
*बायको आज....!*

तरी शक्यता वाटत नाहीं) तितकीच प्रसिद्धीसाठीं हपापलेली आमची सौ.

"बघतां काय माझ्याकडे असे 'आ' वासून? मी म्हणते नां तुम्हीं लिहिलंच पाहीजे म्हणून !" सौ. गरजल्या.

"अग सुमा, मग आपण असं करूं या नां. एखाद्या फंडाकरतां निधी देऊं पाठवून. म्हणजे आपल नांव पण पेप........" शंकराच्या तिसऱ्या डोळ्या पेक्षाहि पॉवरफूल असा सौ. चा उजवा डोळा पाहून माझं वाक्य अर्धवट सोडावं लागलं. उजवा लिहिण्याचं कारण डाव्या डोळ्यानें सौ. कुठे पहाते ते अद्याप मला समजत नाहीं. म्हणजे...अं-हं-हं.. आमच्या सौ. जरा 'ह्या'तल्याच आहेत (पदरी पडलं नि पवित्र झालं ! )

अखेर प्रेमळ पत्नीचा आग्रह (अथवा धमकी म्हणा) मोडवेना म्हणून कांहींतरी लिहायचंच असा निश्चय केला. ललित लेख लिहायचा म्हटलं तर शांतता हवी नाही कां? हिच्या या तोफखान्यापुढे कसली शांतता नि कसलं काय ? लेख रहायचा बाजुला लळीत मात्र पहायला मिळायचं !

'त्यांत काय मोठसं ? लिहायचं म्हटलं तर मला काय लिहितां नाही येणार ? शाळेंत असतांना कितीतरी लिखाण केलंय ! तुम्हाला माहीत आहे काय ? 'वेचलेलें सुविचार' 'हंसा आणि लठ्ठ व्हा' एक ना दोन. कितीतरी लेख दिलेत असले मी शाळेच्या हस्तलिखीत मासिकांत. हा बघ आतां लिहायला बसतों ताबडतोब ! 'शुभस्य शिघ्रम' नाही कां ?"

"तुम्हाला अगदीच कसं हो हे नाही ?" कसलं शुभं नि कसलं शिघ्रम सौ. कडाडल्या.

"तुम्ही घरांत या वेळी लेख लिहीत वसलांत तर तुमची दाढी कोण करणार ? मी ? मिस्टर वैद्य कीनई या सगळ्या गोष्टी ऑफिसांतच करतात. कागद पण तिथलेच. तुमची आपली काय म्हणतात नां तशांतली गत !" (अिथे काय म्हणतात ते फक्त सौ. नाच ठाऊक अथवा त्यांना घडविण्याची घोडचूक करणाऱ्या ब्रह्मदेवालाच ठाऊक)

वरी ब्रह्मदेवाची आठवण झाली. या वेट्यानें प्रतिभा, प्रतिभा काय म्हणतात त्या वावतींत माझ्याकडे अगदीच 'काणा' डोळां केलाय. कसं या लोकांना लिहायला सुचतं नि ते लिहितात कोण जाणे. आतां हेच पहा नां. त्या वैद्याची प्रतिभा उतू चाललीय नि आमची साफ आटली...आटली म्हणावी तर तळाशीसुद्धां नव्हती तर आटणार काय अन् उतूं काय जाणार ? एक तर मराठी विषयाचं नि आमचं पहिल्या पासून हाडवैर आणि आमच्या शैक्षणीक आयुष्यांत या मराठीने मला एकापेक्षां एक असे धक्के दिले आहेत कीं, नुसत्या आठवणी म्हणजे मला एकादं रोमांचकारी वाङ्मय वाटतं. मराठी शाळेंत मलुष्टे गुरुजींचा-हात नि माझा कान यांच्यांत जेवढं सख्य होत तेवढं सवंध विद्यार्थी-दशेत माझंसुद्धां कुणाशी नव्हतं. त्यांच्या तासाची प्रस्तावना 'वाश्या, शिच्या', आणि अन् नाणीं तली 'णो' सारखीच काढशील तर डोच्कंच फोडीन होऽऽऽ!' या वाक्यानें व्हायची तर एका जोराच्या कानपिचकीनें उपोद्घात व्हायचा. हायस्कूलमध्यें एकदां मराठीचा तास ऐन रंगांत आला होता. आणि मी शेवटच्या डेस्कवर पेंगत असता माझे डोके आपटून अक्षरशः कपाळविस्तार झाला होता. अशावेळीं सहाजीकच वर्गवंधु-मगनींचा दंतपक्ती विस्तार झाला तर नवल ते काय ? संपूर्ण जाग आल्यानंतर मला समजलं कीं देसाई सर कल्पना विस्तार शिकवीत होते. कॉलेजमध्यें असतांना कधीहि कोणाशी विशेष न बोलणारे, मिशीच्या वाहेर सहसा न हंसणारे प्रा. परांजपे एकदां मला रस्त्यांत थांबवून म्हणाले, "तुमचे निबंध वाचले वरं कां ! खरोखर तुम्ही मोठे लेखक व्हाल !!"

चंद्रकोरीचा घोडा करून हातांत पिसाचा चाबूक घेऊन मी पृथ्वीभोंवती फेऱ्या मारुं लागलो.

"तुम्ही मि. घाटपांडे नां ?" प्रा.

"नाही सर. मी देशपांडे."

"Oh excuse me"मला वाटलं तुम्ही घाटपांडे."

वाऱ्यानें चंद्रकोर उलटी झाली नि मी– मी स्वतःभोंवती गिरक्या घेत पृथ्वीच्या दिशेनें खाली आलो.

या 'मराठीचिये नगरीं'तून वहात वहात ऑफिस मध्यें केव्हां येऊन पोहोंचलों कळलं नाहीं. हा वैद्य ऑफिसमध्यें लिहीतो काय ? म्हटलं अरे ब्रेट्या, हम भी कुछ कम नही. अरे वापरे. टेवलवर कामाचा 'हा' ढीग पडला होता.. प्रत्येकावर 'अर्जंट'ची स्लीप होतीच. तेवढं उरवलं नाहीं तर साहेब......पण सौ. नी घरून निघतांना आमच्या लेखन कार्यावर 'मोस्ट अर्जंट'चा शिक्का मारलेला आठवला. 'साहेव विहेव कुछ नही. लिहायचं म्हणजे लिहायचं. तावडतोब दोन चार कागद काढले. नि लिहायला वसलो. आणि...आणि सगळंच ओंफस्! विषय ? कोणत्या विषया-वर लिहायचं ? तेवढं विचारलं असतं सुमाला सकाळी तर वरं झालं असतं. हा वैद्य कोणत्या विषयावर लिहतो कोणास ठाऊक ? अशावेळीं नेमकं माझं डोकं चालत नाहीं. परमेश्वरा वाचव रे वाबा यांतून ! शेवटी त्याचाच धांवा करावा लागला. 'धांव पांव रे गोविंदा, हाती घेऊनिया गदा, करी माझ्या डोक्याचा चेंदा–मेंदा...तसं नाहीतर असं. कसंतरी वाचव म्हणजे झालं !

"काय रे देशपांडे. कागद पुढ्यांत घेऊन विचार कसला करतोस ? गोष्ट विष्ट लिहीतोस काय ? हल्ली ज्यांनी उठावं त्यांनी आपल लेखक व्हावं. कांही ताळ तंत्रच उरला नाही. ऑफिसच्या स्टेशनरीवर नसते. चाळे दुसरं काय ?

हा शामराव डोंअीफोडे. दुसऱ्यांच्या भान-गडींत हा स्वतःच डोके फोड करीत वसतो. याला काय करायचंय ? तसा आमच्या सौ. च्या खात्यांत याचा हिशेव केला तर माझ्या पेक्षां कितीतरी पटीनें हा 'अगदीच हा' आहे. या चांभारचौकशांत कोणकिडून तूरीं 'उद्धार' करून घेतो नि म्हणतो अति परीचयांत अवज्ञा !'

सांपडला ! झकास विषय सांपडला. याच विषयावर लिहायचं ठरवलं. मोठ्या अक्षरांत मथळा लिहिला, 'अतिपरीचयांत अवज्ञा' पुढें ? पुढें काय ?....पुढेच दामले साहेब दत्त म्हणून उभे होते. कागद लप-वण्याचा दुवळा प्रयत्न केला. पण मि. देशपांडे, जरा भेटून जा हं मला. एवढं म्हणून दामले निघून गेले. दामले म्हणजे आमच्या सौ. चे लांवचे मामा. तसा आहे मला दोन्हीकडे सासुरवास. घरी भाची ऑफिसांत मामा !

मुकाट्यानें जावून उभा राहिलो साहेवां-पुढें. म्हटलं अिथे आणखी काय वाढून ठेवलंय कोणास ठाऊक ?

"काय नाना, आज आल्यापासून पहातोय. तुम्ही असे अस्वस्थ कां ? मोहिनी (आमच्या सौ. चं माहेरचं नांव. जिच्यामुळें मला जग-ण्याचाहि मोह कमी वाटू लागलाय) ठीक आहे नां ? आणि वरेच दिवसांत आला नाहीत ते आमच्याकडे ! मला वाटलंय तुम्ही रागा-वला असाल तें. अेवढे मन मोकळे तुम्ही, पण आज मात्र परक्यासारखं कागदावर लिहून दाखवलंत हं 'अतिपरीचयात अवज्ञा' म्हणून ! अहो, जावअी माणसं अशीच. कधी काय मनांत येअील पत्ता नाही लागायचा. आम्हीहि जांवअी होतो म्हटलं अेके काळी !" दामले तिन मजली हंसत होते नि माझ्या समोर मात्र प्रश्न होता 'हंसू की रडूं ?' करायला गेलो एक नि हे भलतंच घडत होतं. आतां मात्र नाईलाज म्हणून सर्व कांहीं सांगितलंच पाहिजे यांना. "नाही म्हणजे असं... सुमाचं हल्ली जरा...म्हणजे तिची जरा 'प्रकृति' ठीक नसावी असं वाटतं."

"वा, वा, छान म्हणजे आम्हाला नातवं....."

"तसं खरंच कांहीं नाही आहे. मला म्हणायचं होतं ती थोडी विचीत्रच वागते हल्ली. कांहीतरीच हट्ट धरते हो. आतां आजंच पहा ना, मला म्हणते तुम्हीं लेखक व्हा !"

"आँ, लेखक ? तुम्हीं ?" आतां मात्र दामले सात मजली हंसत होते नि मी अगदी तळमजली हंसण्याचा प्रयत्न करीत होतो. "माझ्या एका लेखक मित्रानें परवांच मला

अनुक्रमणिका






यचं रहस्य सांगितलं. त्याचं असं आहे." दामले माझ्या कानाशी लागले.

"म्हणजे ? इंग्रजी वाचायचं नि तेच मराठींत लिहायचं ? अं ?"

"हळू ! हळू ! आसपास वरेच लेखक आहेत. हे सिक्रेट आहे त्यांचं !"

"बरं तर. उद्या एक डिक्शनरी आणून टाकतो नि चार पांच कादंबऱ्या !"

दामल्यांनी लेखनाची गुरुकिल्लीच दिली म्हणा नां. आतां माझेसुद्धां लेख छापून येणार. मी पण एक कादंबरी लिहीन. अेक, दोन, दहा-शंभर ! मग माझा सत्कार होईल. अशी सारी सुखस्वप्नरंगवत मी दिवस काढला. संध्याकाळी धांवत–पळत पांच चाळीसची फास्ट पकडली. घर जवळ आल्यावर सौ. ला दारांत पाहिल्यावर मात्र लोकलपेक्षांहि काळीज जोरांत धडधडूं लागलं. 'काय लिहीलंत पाहूं ?' म्हणून विचारलं तर काय दाखवायचं? आतां आली कां पंचाईत ?

सौ. दिलखुलास हंसत होती. तिचा मूड आज कांहीं वेगळाच दिसत होता. गेली दोन वर्षं ती विसरल्या सारखी वाटत होती. कालच लग्न झाल्यासारखी वागत होती. घरी आल्यावरोवर चहा फराळ आज प्रथमच मिळाला. 'आज लेख लिहिला नाहीं' असं साफ सांगितलं तर सारंच वातावरण बिघडायचं,

'अे, आज काय वेत आहे ?' धीर करून विचारलंच.

"ओळखा पाहूं !"

"पण मी आज....न..नाही ओळखता येत आम्हाला !" खरं सांगायला जीभ रेटत नव्हती.

"आज किनअी, आईचं पत्र आलंय !"

"कोणाचं."

"आईचं !"

"कोणाची आई ?"

"इश्श ! माझी आई. तुम्हाला कुठे आई आहे ? मेलं सासुबाअींना पाहीलं असतं. पण माझ्या कांही नशीबांत नव्हतं हो त्या माऊलीचं दर्शन ! (इथे कोरड्या डोळ्यांना ओला पदर) तर मी काय म्हणत होते ? हं ! आई येणार आहे वेबीला घेऊन महिन्याभराकरितां. पण मी म्हणते आपण वेबीचं अिकडे लग्नाचं बघू जमतं कां नि मगच पाठवूं त्यांना !"

"छा....न !" आमच्या सासुबाई, सौ. च्या आईच त्या. म्हणजे बघा कसा नमूना असेल तो. अग आईगं ! नको ! त्याच्यापेक्षां लेखक होईन. लेखक ! शंभर कादंबऱ्या ! सत्कार ! हारांचे ढीक....हार फेकतांना सौ. ने घेतलेला चिमटा ! मला एकाएकी आवेश चढला.

"मी आज पासून लिहीणार ! लेखक होणार !"

"कांहीं नको !"

"नको ? कां ? तो वैद्य....

"अय्या, तुम्हाला ती गम्मत सांगायची राहिलीच कीं. अहो, ती मिसेस् वैद्य आली होती. अशी जिरवलीय म्हणता तिची ! खेटर मारल्या सारखा चेहरा करुन गेली."

"म्हणजे ? काय सांगितलंस असं तिला ?"

"सांगितलं आमचे हे टोपण नांवानें लिहितात म्हणून !

"आंऽऽ !"

"हो, म्हटलं पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे ते हेच !!! ●●●














: ५ :

अनुवादक : श्रीकृष्ण ठाकूर

**माझ्याकडें** देण्यांत आलेल्या हुकुमामध्यें लिहिलं होतं. कांहीं काळ तरी उघडा रहाणारा भाग बर्फमय महासागरांत किती आहे यावर, त्या बर्फमय महासागराचा, युद्धाच्या दृष्टीनें किती उपयोग आहे हें अवलंबून असतं. आर्टिक महासागराच्या पृष्टभागावर जाण्याचा मार्ग सुकर कसा होईल हा आमच्या या सफरींतील महत्वाचा भाग. बर्फाच्या खूप खालीं असलेल्या पाणबुडीला रेडिओवरून बाहेर संदेश पाठविता येत नाहींत, किंवा आलेले संदेश ग्रहण करतां येत नाहींत. हवेसंबंधीं कांहीं निरीक्षण करता येत नाहीं. विमानांची कांहीं चाहूल मिळत नाहीं कीं अस्त्रांचें अक्षेपण करतां येत नाही. थोडक्यांत ती पाणबुडी युद्धाच्या दृष्टीनें निरुपयोगी असते.

यापूर्वींच्या प्रयत्नांची पार्श्वभूमि ही कांहीं उत्साहवर्धक नव्हती १९४० मध्यें बाल्डो लायन हा बर्फ खंडांच्या प्रदेशाच्या अगदीं नजीक समुद्रपृष्टावर यशस्वीरित्या आला होता. पण तो जियें वर आला ती अस्ताव्यस्त आणि सुटया असलेल्या बर्फशीलांच्या मधली उघडी जागा होती. अणुसंचलित पाणबुडी नॉटिलसनें 'पुलीन्य' मधून वर येण्याचा प्रयत्न केला, तेव्हां तिचा पेरिस्कोप एका छोटया बर्फशीलेला घासून टेरिस्कोपचें फार नुकसान झालें आणि त्यामुळें नॉटिलसला मागें परतण्याची पाळी आली होती.

उत्तर ध्रुवाच्या दिशेनें पुढें जातांना या साऱ्या गोष्टी आमच्या मनांत येत होत्या. पृष्टभागावर येण्याचा प्रयत्न आम्ही लौकरांत लौकर केव्हां करावा ? यावेळीं पृष्टभागावर येण्याचा प्रयत्न केला तर कदाचित कांहीं धोका होईल व त्यामुळें आम्हांला पुढें नसतां हात हालवीत मागें जाणं भाग पडेल. त्यापेक्षां प्रथम ध्रुवावर जावं व नंतर प्रयोग करावेत असं मी अनुभवानं काढलं.

मी माझ्या घड्याळाकडे पाहिलं. रविवारच्या सकाळच्या प्रार्थनेचा जवळ जवळ वेळ झाला होता. अशा प्रार्थना केल्यानं माझ्या मनाला समाधान आणि साफल्य लाभल्यासारखं मला नेहमींच वाटतं.मी स्वत: जरी प्रेसबिटेरियन पंथीय ख्रिश्चन असलों तरी 'बुक ऑफ कॉमन प्रेअर' मधील साधी आणि सुंदर भाषा मला फार आवडते. तें पुस्तक घेऊन कुणाहि सामान्य मनुष्याला प्रार्थना करतां येईल. आज या रविवारीं बर्फाच्या खालीं शेंकडों फूट आणि घर व कुटुंब यांपासून हजारों मैल दूर असलेल्या आम्हांला त्यांतल्या एका भागामधून शक्ति व सामर्थ्य यांचा लाभ होईल असें मला वाटतें.

.... त्याच्या हातामध्यें भूतलावरचे सारे काने कोपरे आहेत; आणि पर्वताचं सामर्थ्यहि त्याचंच आहे. समुद्र त्याचा आहे; आणि तो त्यानें केला. त्याच्याच हातांनीं कोरडी जमीन केली...

खलाशांच्या भोजनगृहाकडे मी जात असतांना, बर्फ शोधणाच्या यंत्राकडून गेलों. आमच्या डोक्यावरील पृष्टभागावर असलेली बर्फ शीलांची न संपणारी मालिका वॉल्ट व्हिटमन बारकाईनें पहात होता. 'कॅप्टन' तो मला म्हणाला, 'गेलीं कांहीं मिनिटं अशीं कांहीं लक्षणं दिसताहेत कीं आपण उघड्या समुद्राच्या जवळ चाललों आहोंत. कुठें कुठें उघडं पाणी असावं. तें– तें पहा–'

एक बारीकशी काळी रेषा परत परत दिसेली, नंतर जशी ती एकाएकीं दिसली तशीच एकाएकीं नाहींशी झाली. त्या यंत्रावर ती





अनुक्रमणिका

*....स्केट जसं जशी उत्तर ध्रुवाकडे सरकत होती तसं तशी मनांत धरून असलेली भीतिहि दुप्पट वाढत होती .... मनांतून ईश्वराची प्रार्थना म्हणत होतो आम्ही .... एकेक दिवस एकामागून एक असें सरकत होते ....आणि.... शेवटी .... स्केट आम्ही वर घेतली .... आणि ....* **पुढे वाचां**

---

रेषा जवळ जवळ मिनिटभर होती. आणि आमचं जहाज साधारणतः मिनिटाला ५०० यार्ड गतीनं धांवत होतं.

'आपण पाहिलेल्यांत ही सर्वात मोठी उघाड.' उत्सूकतेनें वॉल्ट म्हणाला. "अशीं आणखीं पुढें किती दिसतील कोण जाणें !'

कालच्या निराशेंतून बाहेर पडण्यासाठीं माझ्या या सहकाऱ्यांना एखाद्या गोष्टीची किती वरं जरूरी आहे ! माझ्या मनांत विचार आला. अद्यापपर्यंत उत्तरेला इतक्या लांबच्या पल्ल्यापर्यंत कोणतीहि पाणबुडी पृष्टभागावर आलेली नाहीं. इतक्यांत मी माझा विचार बदलला.

'नोंदी करणाऱ्या (Plottting) माणसांना बोलवा, प्रार्थना मग करूं.' मी म्हणालों.

आमच्या या सफरीमध्यें, आतां जे महत्वाचे क्षण येत आहेत त्यांच्यासाठीं आम्ही आठवडेच्या आठवडे एका समूहाची तयारी करीत होतो. ते क्षण इतक्या लौकर येतील असं या पथकाला वाटलं नव्हतं. मात्र ते सर्वजण आपापल्या जागेवर हजर झाले. इंजिनिअरिंग अधिकारी विल काउहिल् हा डायव्हिंग अधिकाऱ्याच्या जागेवर, लेप्टनंट अल् केहन - आमचा इलेक्ट्रॉनिक अधिकारी हा वर्फाच्या यंत्राकडे, आणि या सर्वांचा प्रमुख होता निक.

अंदाज केलेल्या उघडीच्या खालीं आमची पाणबुडी मागें पुढें होत होती. आमच्या हालचालींची नोंद केली जात होती; व त्यायोगें त्या तळ्याचा नकाशा तयार होत होता. हें आमचं काम नवं होतं. आम्ही जें चित्र तयार करीत होतों तें धूसर होतं. अंदाजें आकार तयार झाला. शेवटीं एकदाचे आम्ही त्या तळ्याच्या मध्य बिंदूखालीं येऊन थांबलों.

समुद्राच्या दावाचा प्रतिकार होत असतांहि मी पेरिस्कोप वर केला आणि तिथंच सुरवातीला वर्णन केलेला तो सुंदर जेलीफीश दिसला.

पेरिस्कोप खालीं करून मी एकवार शेवटचं नकाशाकडे पाहिलं आणि 'वरती सारं ठीक आहे ना ?' म्हणून पृच्छा केली.

अल् केहन यानें निर्विकार चेहऱ्यानें आपला डावा हात वर केला. आंगठा व जवळचं बोट यांनीं वर्तुळ केलं व बाकीची तीन बोटं वरच्या दिशेनं ताठ केलीं.

वर्फानें व्यापलेल्या समुद्रांतल्या ह्या पहिल्याच तळ्यावरील स्वच्छ शुद्ध हवेचा आस्वाद मी जवळ जवळ अर्धातासपर्यंत घेत होतों. समुद्रसपाटीपासून पंचवीस फूट उंचीवर असलेल्या पाणबुडीच्या ब्रीजवरून मला, आम्हीं योगायोगानें उभे असलेल्या तळ्याहूनहि मोठीं असलेलीं तळीं दिसत होतीं. एकसमयावच्छेदें करून पाहिलेलं तें दृश्य पाहून वाटे हा वर्फाचा अथांग असा दर्याच आहे. वर्फाचे खंड, चारी बाजूला प्रचंड अशा वेड्यावाकड्या कापलेल्या चित्राच्या 'जिग् सॉ' कोड्या प्रमाणें पसरले आहेत असें, दृष्टी पोंचे तोंपर्यंत पाहिल्यावर वाटे. दूरवर, माथ्यावरील आकाशाचे वर्फाच्या रंगांत मिसळून क्षितिज दिसतें न दिसतें असें होई.

नखशिखांत सारें अंग झाकणारा 'पार्का' पेहरून अत्यंत उत्साही मनानें वॉल्ट विरमन ब्रिजवर आला. त्याच्या हातांत वर्फाच्या नमुन्यांसाठीं एक डबा, लांब गांठीगांठीच्या दोरीला जोडलेला थर्मामीटर, आणि एक दुर्बिण होती. जातिवंत चित्रकाराची जशी आपल्या चित्रकलेवर भक्ति असते, तशी वर्फाच्या अभ्यासावर वॉल्टरची भक्ति आहे. मैलोगणती गोठलेल्या समुद्रांतल्या थंडगार तळ्यांत तरंगण्याचा अनुभव आमच्यापूर्वी कुणीहि घेतलेला नव्हता, आणि तो अनुभव घेतांना वॉल्टच्या वृत्ती उचंबळून आल्या होत्या.

डॉ. ला फांड हा थोड्याच वेळांत तिथें आला. आणि मग विटमन, लाफांड आणि पॉल डोर्नबर्ग असे तिघेजण त्या तळ्याच्या किनाऱ्यावर जाण्यासाठीं, अशा कामासाठीं स्केटवर असलेल्या रबरी होडींतून निघाले. थोड्याच वेळांत सफेद समुद्रपक्षी आम्हांला येऊन मिळाले. डॉ. लाफांड आपल्या दुर्बिणींतून त्यांचं निरिक्षण करीत होता. मागाहून त्यानं मला सांगितलं कीं त्या पक्षांना 'आइसम्यूज' असं म्हणतात. मी ब्रिजवर रिकामपणें उभाराहून हा भव्य देखावा अणि त्याच्या तुलनेनें मासगारी माणसाची व त्याच्या कर्तबगारीची क्षुद्रता यांच्या विचारांत ज्यावेळीं गर्क होतों त्याचवेळीं आमचे शास्त्रज्ञ मोजमापं घेण्यांत— घेतलेले निर्णय बरोबर आहेत याची खात्री करण्यांत गर्क होते— आजुबाजूच्या परिस्थितीवर आपल्या सामानाच्या जोरावर मात करीत होते हें पाहून मी जरा अवघडून गेलों

त्या दिवशींच जेवण हें मेजवानीसारखं होतं. आदल्या दिवशींच्या निराशेची जागा आज अमाप उत्साहानं घेतली होती. आणि सर्व जहाजावर आत्मविश्वासाची नवी छटा दृग्गोचर होत होती.

भोजनोत्तर निग्यहसनेन पेरिस्कोपमधून सूर्याचे पुष्कळसे फोटो घेतले. सेक्टंटपेक्षां पृष्टभागावर पेरिस्कोपचा उपयोग करणंच पुष्कळदां सोईचं पडतं. सूर्याच्या निरिक्षणानं निश्चित केलेले आमच्या मुक्कामाचे अक्षांश—रेखांश डेडरेकनिंगनें काढलेल्या हिशोबाशीं बरेच जुळत होते. डेड-रेकनिंग पद्धतीनें निश्चित केलेली आमची जागा होती, तिच्या जवळच एक हलक्या हातानं काढलेलं वर्तुळ होतं. 'इनर्शिअल नॅव्हिगेशन' नें दर्शविलेली आमची जागा होती ती. हीं तीनहि तंत्रं एकमेकांशीं जुळताहेत ही जाणीव मोठी सुखदायक होती.

आतां परत मार्गक्रमणाचा वेळ झाला असं मी ठरविलं. आमच्या आवती भोवतीं शेवटचा दृष्टिक्षेप टाकण्यासाठीं मी ब्रीजवर गेलों आणि पुरतं एकवेळ उत्तरेकडील वर्फमय क्षितिजाकडे नजर टाकली. अनंतापर्यंत वर्फाचा अफाट प्रदेश पसरलेला दिसत होता.





अनुक्रमणिका

मी किती दूरपर्यंत पाहूं शकेन वरं ? जास्तींत जास्त सहा मैलपर्यंत आणि उत्तर ध्रुव ? तो चारशें मैलांच्याहि पलिकडे होता.

अरुंद शिडीनं उतरून मी कंट्रोल सेंट्रमध्यें आलों. तिथें विल काडहिल सर्व तयारीनिशीं बसला होता. पाणबुडी खालीं नेतांनां सामान्यपणें ती तिरप्या दिशेनें हळूहळू खालीं न्यांवी लागते. पण इथें मागेंपुढें व्हायला जरासुद्धां जागा नसल्यानें स्केटला सरळच खालीं जावं लागणार.

पाण्याच्या थेंबहि आंत जाऊं न देणारी ब्रिजची मजबूत झडप वंद केली. स्केट खालीं जावयास सज्ज झाल्याची काडहिलनें सूचना दिली; आणि तो प्रतिध्वनि जहाजामध्यें घुमला. पाणवुडीच्या रिकाम्या टाक्यांत शिरतांना पाण्याचा हा मारा रों रों आवाज आम्हांला ऐकूं येत होता.

पेरिस्कोपमधून मी स्केटच्या नावेकडे आणि पिछाडीकडे पाहिलं. स्केट सावकाशीनं शांत निळ्या जलाश्यांत स्थिरावत होती. त्या तळ्याच्या कडांकडे मी पाहिलं. त्याच्या अंडाकृति आकाशांत दोन तासांत काहीं बदल झाला नव्हता. आमच्या ह्या तळ्याच्या पृष्ठ-भागावर जराहि हालचाल झाली नव्हती. ती जागा, तें वातावरण आम्हांला अनुकुल वाटत होतं.

आम्ही जसजसे खालीं जात होतों तसतसा पृष्ठभागावर असणारा पेटीस्कोपच आमचं अस्तित्व दर्शवित होता. पेटीस्कोपचा पृष्ठभाग पाण्यांत शिरण्यापूर्वी दोन समुद्रपक्षि त्याच्यावर वर्तुळाकार फिरून गेलेले मी पाहिले.

आम्ही पुरेसे खालीं गेलो, कितीहि खोल असणाऱ्या वर्फ-शिवेचा आम्हांला मुळींच धोका नाहीं याची खात्री झाली तेव्हां पाणवुणी उत्तरेच्या दिशेनं हांकारण्याचा मी हुकूम दिला. वर पेरिस्कोप वरोवर पाहिलं आणि परत एकवेळ आमच्या माथ्यावर अगदीं जवळ काळोख असल्याचं दिसून आलं. आम्ही जाड अशा वर्फथराखालून जात होतों.

मवां पुढें ढकललेली प्रार्थना करावी यासाठीं मी आतां उत्सूक झालों होतों आणि मग प्रार्थना करण्यासाठीं आम्ही खलाशांच्या भोजनगृहांत जमा झालों. वायवलच्या १४९ व्या गीतांतील काहीं भाग हा आमच्या आजच्या स्थितीशीं मिळता जुळता आहे असं मला वाटलं. प्रार्थनेच्या शेवटीं मी वाचलं––

....परमेश्वरा तुझ्या चित् शक्तीला सोडून मी
कुठें जाऊ ? किंवा तुझं अस्तित्व सोडून मी कुठें पळू ?
जर मी प्रात:कालचे पंख घेतले व महान् सागराच्या
अगदीं टोकाला भ्रमण करूं लागलो––
तरी तिथें माझ्या रक्षणार्थ तुझाच हात असेल.
तू तुझ्या उजव्या हातानें मला धरलेलं असशील.......!

प्रसिद्ध लेखक विल डयूरंट यानें 'एज् ऑफ फेथ्' या ग्रंथांत म्हटलं आहे कीं प्रगती करण्यासाठीं माणसानें कार्य-कारणभावाचा विचार केला पाहिजे, पण जगण्यासाठीं त्यानें श्रद्धा ठेवली पाहिजे. हें असं कां ? तें तसं कां ? या मानवाच्या विचार करण्याच्या शक्तिपुढेंच स्केट जन्माला आली आणि कार्यान्वित झाली. पण त्याच स्केटचे प्रमुख असलेलें आम्ही पुष्कळदां आमचीं कर्तव्यं पार पाडण्या-साठीं त्या जगन्नियंत्याच्या कृपेचा प्रसाद मागत आहोंत. या महा-सागरांतील अत्यंत आंतील भागांत आमचीं कर्तव्यं पार पाडण्यासाठीं– हें जहाज वांधण्यासाठीं ज्यांनीं ज्यांनीं हातभार लावला त्यांतील वहुतेक माझ्या परिचयाचीं आहेत– त्यांचा विचार माझ्या मनांत आला. एका पांढऱ्या शुभ्र केसाच्या ॲडमिरलची मला आठवण झाली. त्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तिनें हें शक्य झालं. त्याच्या मेजाकडे भिंतीवर खालील वचन आढळतं, त्याचीहि आठवण झाली.

'आमच्या संशयानें आमचा घात केला जातो,
जें कांहीं आम्ही चांगलं जिंकू तें, तो
संशय गमवायला लावतो.........'

आमचे जहाज हांकण्यासंवंधीचें हुकुमाचे पातळ, निळे, घडी केलेलें ते कागद टेवलावरील हिरव्या फेंदरवर पडले होते. त्याक्षणीं प्रत्यक्ष कामावर नसलेलें सारे अधिकारी माझ्या भोंवतीं जमलें होतें. 'मी हा हुकूम परत वाचतों म्हणजे मग आपणाला काय करायची परवानगी आहे तें कळेल ! मी म्हणालों.

'जर उत्तर ध्रुवावर चौदा ऑगस्टपर्यंत पोचलेत तर तुम्हांला ड्रिफिट आइस––स्टेशन अस्प्याच्या दिशेनें जाण्याची परवानगी आहे. तियल्या अधिकाऱ्यांशीं व्यक्तिगत संपर्क साधा आणि नंतर जवळपास समुद्र पृष्ठावर या. त्यामुळें गांठमेट होऊं शकेल.'

तें आंतरराष्ट्रीय भूभौतिकी संशोधनाचें वर्ष होतें. अमेरिका वर्फमुल्य उत्तरध्रुव प्रदेशांत दोन संशोधन केन्द्रें सांभाळीत होती. वर्फाच्या सरकण्यामुळें सर्व स्टेशनवरील लोकांचा दिवसाला दोन तीन मैलांचा प्रवास होई, व त्या अज्ञांत प्रदेशांतील, इतर वेळीं गोळा करणं अशक्य असलेली माहिती ते गोळा करूं शकत.

अशीं संशोधन केंद्रें आंतरराष्ट्रीय भूभौतिकी वर्षातच नव्यानें सुरू झालीं असें नव्हे. विह्याह्यूर स्टिफ़ेन्सन आणि त्याचा कणखर दुय्यम स्टॉरकर स्टॉरकर्सन यानां सरकत्या वर्फावर कँप करून रहायची कल्पना व त्यायोगें ध्रुवप्रदेशाची शास्त्रीय माहिती मिळविण्याची योजना १९१८ सालींच सुचली होती. अलास्काच्या उत्तरेला दोनशें मैलावर स्टॉरकर्सन यानें एक कँप ठोकला व तो आणि त्याचे चार सहकारी त्या कँपमध्यें सहा महिने राहिले. आणि तेवढ्या वेळांत ते चारशें मैल दूर गेले.








दुसऱ्या महायुद्धानंतर सरकत्या वर्फावरील एका रशियन संशोधन केंद्रानें आर्टिक महासागराची एक अति वेधक गोष्ट शोधून काढली. ग्रीनलंडपासून न्यूसैबेरियापर्यंत पसरलेली पाण्याखालीं बुडलेली भव्य अशी पर्वतश्रेणी त्यांनीं शोधून काढली. सोवियत लोकांनीं त्या पर्वत श्रेणीला 'लोमोनोसॉव' असं नांव दिलं. हा अठराव्या शतकांतील एक रशियन शास्त्रज्ञ.

यावेळीं अमेरिकन संशोधन केंद्र 'आदफा' हें उत्तर ध्रुवापासून अलास्काच्या दिशेनं तीनशें मैलांवर तरंगत होतं. पंचावन लक्ष चौरस मैलांच्या भिनलेल्या पाण्यांत आणि तेंहि वर्फाखालून तें शोधून काढण्याची कल्पनाच इतकी चमत्कारिक होती– मी माझ्या सहकाऱ्यांबरोबर अजूनपर्यंत तिची चर्चा विशेष गांभिर्यानें केली नव्हती.

"या हुकुमाप्रमाणें 'आल्फा' शोधलंच पाहिजे असं कांहींबंधन नाहीं. तेव्हां आपण आल्फा शोधण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे का ? आपणांस काय वाटतं ? मी विचारलं.

सर्वांनीं अत्यंत उत्साहानें होकारार्थी उत्तर दिलं. नॅव्हिगेटर म्हणून ते केंद्र शोधण्याचं काम ज्याच्याकडे होतं तो निकल्सन म्हणाला 'मला वाटतं उत्तर ध्रुवावर गेल्यनंतर आपण 'आल्फा' शोधू शकूं. आपण आल्फाच्या आसपास समुद्र पृष्ठावर येऊंन त्यांच्याशीं रेडिओ-वरून बोलूं.'

आमचा मुख्य इंजिनिअर विल् लेमन म्हणाला, 'या क्षणीं आल्फा कुठें आहे हें आपल्याला माहीत आहे का ?'

'यापुढच्या थोडयाच दिवसांत तें कुठं असण्याची शक्यता आहे तें मला ठाऊक आहे.' मी म्हणालों 'मला हा अंदाज कितपत बरोबर असेल कोण जाणें !'

'जर का आपण आल्फाच्या आसपास कांहीं मैलांच्या अंतरावर पृष्ठभागावर आलों तर आपण रेडिओ दिशा शोधकाच्या सहाय्यानें आल्फाच्या दिशेच शोध लावूं, नंतर परत पाण्याच्या खालीं जाऊन त्या दिशेनं आल्फा येईपर्यंत पाणवुडी चालवूं' निक म्हणाला.

'पण आल्फा आपल्या डोक्यावर आलं आहे, हें आपल्याला कसं कळणार ? डेव्ह् बॉयड्नें शंका व्यक्त केली.

'तें कांहीं मलाहि सांगतां येणार नाहीं.' निक म्हणाला त्याबाबतींत आपणाला थोडासा नशिबावर हवाला ठेवायला हवा.'

दुसरा दिवस ऑगस्ट अकरा तो सर्व दिवस माझ्या सहकाऱ्यांच्या मनावरील ताण वाढूं लागला. निकल्सननें लाउड-स्पीकरवर सांगितलं कीं 'जर कांहीं सर्व सुरळीत चाललं तर आज मध्यरात्रीनंतर थोडयाच वेळांत आपण ध्रुवावर जाऊं.'

आतां प्रत्येकजण हुशारींत होता. स्केट आतां सोळा नौरपेक्षां जास्त गतीनें उत्तर ध्रुवाकडे चालली होती. आम्ही आतां समुद्र पृष्ठाखालीं २६० फुटांवर होतों व वरतीं सध्यां एकहि उघडं तळं नव्हतं. आमचे एका वर्षानें श्रम आणि ध्येय आतां कांहीं मैलांवर होतं.

'इनर्शियल नॅव्हिगेशन' खोलीमध्यें कॅथॉड टयूबचे थरथरणारे हिरवे सिग्नल आम्ही उत्तर ध्रुवाच्या जवळ जवळ जात असल्याचं दर्शवीत होते. या उत्तर ध्रुवाकडून एकच दिशा दर्शविली जाते. दक्षिण, तिथलीं माणसं या सर्व खुणा नौदलाच्या परिभाषेंत काळजीपूर्वक नोंदवीत होतीं.

झेन सँडस्कीच्या यंत्राजवळ मी गेलों तेव्हां तो म्हणाला 'कॅप्टन आतां अवघं एक मैलाचं अंतर राहिलं आहे.'

'मार्ग व्यवस्थित आहे ना ? मी विचारलं.

'नालेच्या दिशेनं, तुम्हीं सांगितल्या प्रमाणं बरोबर आहे. तुम्ही त्याचे दोन भाग करूं शकतां' झेन म्हणाला.

मी कंट्रोलसेंटरमध्यें जाऊन ध्रुवापर्यंतचं राहिलेलं अंतर माइकवरून सांगितलं. नंतर डेक अधिकारी अल् केहनकडे वळलों व म्हटलं 'स्केटची गती पांच नॉट इतकी करू. आपल्याला कोणताहि धोका न पत्करतां आपलं ध्येय गाठायचं आहे.

त्या शांत खोलीमध्यें वेलचा आवाज फार मोठा वाटला. नकाशाच्या टेबलाकडून निक म्हणाला 'आतां फक्त एक मिनिट'

नंतर त्यानें माझ्याकडे सिग्नल दिला व मी मोजावयास सुरवात केली. '......चार, तीन, दोन, एक. बारा ऑगस्ट एकोणिसशें अठ्ठावन रोजीं, ग्रिनविच वेळेप्रमाणें बरोबर एकवाजून सत्तेचाळीस मिनिटांनीं 'स्केट' पृथ्वीच्या उत्तरेकडील शेवटच्या बिंदूवर जाऊन पोचली. तुम्हां सर्वांना माझे धन्यवाद. पण ही फक्त सुरवात आहे. पाणवुडी इथपर्यंत या बर्फमय प्रदेशांत येऊं शकते, इच्छेप्रमाणें हवी तिकडे जाऊं शकते, इच्छा होईल तेव्हां पृष्ठभागावर येऊं शकते आणि आपल्या राष्ट्रासाठीं हव्या त्या गोष्टीची ने-आण करूं शकते हें आपणाला अद्याप सिद्ध करावयाचें आहे.'

आम्ही लगेच सावकाशीनं पाणवुडी वळविली आणि 'आल्फा' या तरंगत्या संशोधन केंद्राच्या दिशेनं हांकारली. **क्रमश**



*एखादा जोराचा सडका येण्याची चिन्ह दिसत होती. भरलेल्या आभाळाकडं धोंडिवानं पाहिलं आणि पाऊलं उचालायची कोशिस करू लागला. पण ....?*

—रा. रं. बोराडे

**आभाळाला** गळती लागली होती. सुर्याच्या टोकावनी पाणी—गळत होतं. सात आठ दिवसापासून अशी झड सुरूं होती. जमिनींत खोलवर ओल शिरली होती. शेतांत नुसता पाय ठेवावा म्हटले तर मसकन् गुडघ्या बरोबर पाय आंत जात होता. वाफसेच असे मोडून बसले होते. व वाफसे मोडल्यामुळें शिवारांतला सारा काम-धंदा बंद होता. गुरं-ढोरं दावणीला वांधून होतीं. धरणकुटी बांधावी तशी दावणीला वांधली होती. आणि लोकं पावसाकडे सतत डोळे लावून बसले होते. पाऊस कधी थांबणार याची वाट पहात होते, पण कांहीं केल्या पाऊस थांबत नव्हता. अधुनमधून तो थांबल्यासारखा वाटे, पण पुन्हां एकदम आभाळ भरून येई. झाकाळून अल्यावनी येई आणि मग सपा सपा पाऊस येई. घटका घटका धुमाकूळ घाली आणि मग मूळ पदावर येई. पुन्हां त्याची पिरपिर सुरुं होई सुर्यांच्या टोकावनी धारा गळूं लागत. लोकांच्या मनावर काळजीचं लिंपण करीत . . .

रानांतल्या पिकांना जोम आला होता. लोकांच्या आशा पालवल्या होत्या. कष्टाचं भरघोस माप पदरांत पडणार असं वाटलं होतं आणि एवढ्यांत या वैऱ्यानं दावा साधला होता. जोमांत आलेली पिकं पिवळीचुटूक पडलीं होतीं. एखाद्या रोगेजल्या माणसासारखी दिसत होतीं. आणि हा पाऊस असा आणखी चार दिवस ठाण मांडून वसला तर तीं परत सांवरण्याची आशा नव्हती. संबंध वर्षाची मेहनत या एका गोष्टीमुळं वाया जाण्याची भीति होती. लोकांचे चेहरे काळजीनं ओढले होते. घराघरांवर सुनकी अवकळा आली होती. प्रत्येक जण आपापल्या फिकीरींत होता.

धोंडीबानं वनल्या बसल्याच चोरट्या नजरेनं बायकोकडं पाहिलं. पोटाशी लेकराचा भार घेऊन ती अवघडून बसली होती. कसला तरी खोल विचार करीत होती. बराच वेळ असं बसल्यानंतर तिची लेकरावरची—पकड सुटत होती. पुन्हां ती सांवरून बसत होती. पोराला परत पोटाजवळच्या उबेंत आवळून धरीत होती. धोंडीबानं एकाच नजरेंत एवढं हेरलं—एवढ्यांत तिचीहि नजर त्याच्या कडं गेली. दोघांच्या नजरेची मिळगत होताच तिनं विचारलं—

" काय टेम झाला आसल वं ? "

" कुनाला ठाव ! "

" एकवार बगा तरी की ! "

धोंडीबानं नेहमीप्रमाणं उठण्याचा प्रयत्न केला, पण त्याला लवकर उठता येईना. परवरांत सगळीकडं ओल पसरली होती. अशा ओलीवर बसून पाय बधिरल्यासारखें झाले होते, धोंडीबा कसा-बसा उभा राहिला. अवघडल्यावनी चालत दाराजवळ आला. कोंडी काढून दार उघडलं. त्याबरोबर एकदम पावसाचा एक वसारा आंत आला. तोंडावर गार—पाण्याचा एक सपकारा बसावा तसं झालं त्याला. धोंडीबाच्या अंगावर सरकन् काटा उभा राहीला. तशाहि अव-







अनुक्रमणिका

स्थेंत त्यानं वाहेर पाहिलं. पावसाची वुर वुर आणखी सुरुच होती. जिकडं नजर टाकावी तिकडं घूसर वाटत होतं. आभाळाचा रंग तर एकसारखाच वाटत होता. पोते-ऱ्यानं भिंत सारवावी तसं वाटत होतं. पाऊस थांवण्याची तर कांहींच चिन्ह दिसत नव्हतीं. वेळेचा अंदाजहि लागत नव्हता. धोंडीवानं दार लावलं व तो माघारीं फिरला. रखमानं उतूं जाणाऱ्या उत्सुकतेनं विचारलं,

" कां व, किती टेम झाला आसंल "

" काई कळत न्हाई "

" उगं अंदाज तरी "

" न्ह्यारीची येळ झाली आसंल की "

" थांवतोय कां ?

" छ्या, काई आकार दिसत न्हाई "

" मग कसं करताव ? "

" कस्याचं ? "

" चूल पेटवावी लागल की "

" तर ! पेटविल्यासिवा कसं तर ! "

" मग कसं करावं ? "

" तूंच कर की काई तरी खरवड "

" म्या काय खरवड़ करुं ? काई म्हनता काई व्हायलं न्हाई घरांत "

" कुठनं उसनं-पासनं मिळालं तर वग की "

" कोन द्याया वसलाया आतां उसनं पासनं....

आठ दिवसापासुन ह्या वावानं ताळ सोडलाया. ज्याचं त्यालाच पडलंया. मग आपलंच कोन वगत वसलं "

" काल मिळालतं जनूं की "

"घा घरं हिंडले तंवा पसाभर मिळालतं. पर आसं रोज कुंवर हिंडावं ? वरं, मागायला गेलं तरी वी मिळायचा नेम न्हाई. त्यानला तरी काय म्हनावं ! सगळ्याचीच हालत जर त्या परकारची झाली तर त्यानला तरी काय म्हणून नांव ठेवावं "

" मग कसं करावं म्हणतीस ?"

"तुमीच वगा की एकांदी चक्कर मारुन"

" चक्कर मारुन काय करुं ? ".

" कुनी रोजगाराच्या वोलीवर काई दिलं तर वगा की " "ज्याला त्याला आपलीच जिथं फिकीर पडली तितं दुसऱ्याकडं कोन वगाया लागलाया. कुनाला रोजगाराचं इचारायला गेलं तर तो सेतवाला म्हणतो; वावा, आमचं आमाला पडलंया आमाला तोंडात घास घालावा वाटंना आन् तुमाला कसं पोटपानी सुचायलंया.

" मग कसं करताव ? "

कांहीं तरी करायला पाहिजे होतं; आवली पायली दाणादुणा घरांत आणावयास पाहिजे होता. हा वावा आतां असा हट्टाला पेटलाय. कदाचित आणखी चार आठ दिवस तो असाच पडत राहील. आणि आतां थांवला तरी चार दिवस वाफसे होणार नाहींत. आणि वाफसे नाहीत म्हटल्यानंतर काम-धंदाहि नाही व काम-धंदा नाही म्हणजे हक्काचा दाणादुणाहि घरांत येणार नाहीं. वरं कुण्या शेतवाल्याला कांही मागायलाहि जीभ रेटत नाही. अगोदरच त्यांचे चेहरे सुतकी दिसतात. त्यांच्या या अशा चेहऱ्याकडंच अगोदरच पहावत नाही. आणि पहाण्याचा प्रयत्न केला तर विचारायचा धीर होत नाही—वरं, एवढा, धीर दाखवला, कोशीसीनं विचारलं तरी त्यांची कडवट वोलणी खावी लागतात. मग काय करावं ?चार सहा दिवसांची वेगमी घरांत कशी आणावी ? धोंडीवानं मनाशी थोडावेळ विचार केला. पोत्याचा घोंगता करुन डोक्यावर ठेवला.—

—एवढयांत रखमानं विचारलं—

" कुठं निगालाव ? "

" धोंडीवा वाहेर पडतां पडतां म्हणाला

" वगतो काय तरी खडवड करुन "

धोंडीवा रस्त्यावर आला तेव्हां पाऊस कांहीसा कमी झाला होता. पण आभाळ पुन्हां भरुन येत होतं. धुरकटलेल्यां आभाळावर काळसर थर पसरत होतां. अंधारुन आलयावनी वाटत होतं. एखादा जोराचा सडका येण्याची चिन्हं दिसत होती. भरुन आलेल्यां आभाळाकडं धोंडीवानं पाहिलं आणि तो वेगानं पावलं उचलण्याची कोशीस करुं लागला—पण त्या त्या मोकळंपणानं त्याला चालतां येईना. सगळीकडं कशी नुसती राडेराड झाली होती. चिखलावर पाय ठेवल्या शिवाय चालतांच येत नव्हतं. चिखल चुकवायला जावं तर घसरणीवरुन चालावं लागणार होतं. म्हणून धोंडीवा चिखलांतूनच चालूं लागला.

तात्या जाधवाच्या घरी तो आला तेव्हां तात्यावा घरींच होता. अंगाभोवती घोंगडं लपेटून. कुठं तरी नजर लावून वसला होता. धोंडीवा त्याच्याजवळ आला तरी तें तात्यावाला जाणवलं नाही. तात्यावाच

## कै. हरिभाऊ व त्यांचे तत्कालीन वाचक

(१) 'मधली स्थिति' या कादंबरींत हरिभाऊंनीं केलेल्या वेश्येच्या घराचें व जीवनाचें वर्णन वाचून पुण्यांतील एका नामांकीत वेश्येनें हरिभाऊंना पत्र पाठवून आपला विस्मय व्यक्त केला होता.

(२) 'मायेचा वाजार' या कादंबरींत नायिका पद्मा हिच्यावर जे संकटाचे भयंकर प्रसंग हरिभाऊंनी आणलें आहेत तें वाचून एका वाचकांने त्यांना पत्र पाठविलें..."या स्त्रीचा तूं इतका छळ केलास, तेव्हां तूं असा पाषाणहृदयी आहेस तरी कोण ? तिला थोडा तरी सुखाचा अनुभव येऊं दिला असतास तर त्यांत तुझ्या बापाचें कांहीं गेलें असतें कां ? "

(३) नाशिकच्या एका विद्वान शास्त्र्यांनी हरिभाऊंची 'चंद्रगुप्त' वाचल्यावर त्यांना लिहिलें कीं....'मुद्राराक्षस' नाटक मी कित्येक वेळां वाचलें व विद्यार्थ्यांनाहि शिकविलें; पण आर्यचाणक्याच्या भूमिकेचें रहस्य आपली कादंबरी वाचूनच माझ्या लक्षांत आलें...'

(४) त्यांची निकटवर्ती माणसें त्यांना म्हणत.., 'पहा हो, मला एकाद्या कादंबरी बिदंबरींत उतरून घ्याल...'



अनुक्रमणिका

असं सहजासहजी आपल्याकडं लक्ष जात नाही असं दिसतांच तो खाकरला तात्याबानं नजर वळवून त्याच्याकडं पाहिलं व उगी-चच सावरून बसल्यावनी करीत तो म्हणाला—

" घोंडीबा व्ह य ! ये की "

पत्र्याच्या पाण्याखाली घोंडीबानं पाय धुतलं धोतरानं साफ पुसले व ढुंगणाखाली रकटं घेऊन तो खालीं बसला.

तात्याबानं पटक्याच्या वळीतून दोन बिड्या काढल्या. एक घोंडीबाच्या हातांत दिली. दुसरी आपल्या हातांत घेतली. व बिडी शिलगावतां शिलगावतां त्यानं विचारलं

" कुणीकडं आलतास ? "

बिडीवरची राख झटकिल्यासारखं करीत घोंडीबा म्हणाला—

" तुमाकडंच आलतो.

" का की वा ? "

" वगार इकायचीय म्हन की तुमची"

" अगुदर न्हवता इचार, माची येगडी झाली तवां तिलाच मोठी करावी म्हनलं व्हतं, पर माझ्यानं काई वडदास्त हुईना तिची त्यांतनं ही आसली झड–उगं मुक्या जिवाचा तळतळाट घ्यावा त्यापरीस एकाद्या खात्या दावणीला बांधावं म्हनलं "

आणि घोंडीबाला त्यानं विचारलं—

" घ्यायचीय का तुला ? "

" घ्यायची व्हती पर आतांच जमत न्हाई "

" मग कंवा तर ? "

" सुगीवर वघतो जमलं तर "

" मंग आतां वगार घेऊन जा आन् सुगीवर पयसे दे "

घोंडीबाचा चेहरा थोडा मोकळा झाला, सांवरून बसत तो म्हणाला—

" तसं काई केल्यास धीन की "

" केवढ्याला घेतोस ? "

" तुमचा माल हाय तंवा तुमीच सांगाव हें वरं "

तात्याबानं थोडा वेळ मनाशी विचार केल्यासारखं दाखविलं व नंतर तो म्हणाला—

" पन्नासाला घेऊन जा की "

घोंडीबाच्या चेहऱ्यावर ताबडतोब आश्चर्य पसरलं—

" पन्नास लई व्हतेत "

" तुजी कुटवर आमना हाय ? "

" आसं बोलल्यावर कसं बोलावं "

" मनांत हाय ते बोलून दाखिव–पसंत पडलं तर व्हय म्हनीन नग वाटलं तर न्हाई म्हनीन "

घोंडीबा थोडा वेळ थांबला व नंतर बिडीचं तोंड जमिनीवर दावीत म्हणाला—

" पंधराला दे जा की "

शेरडी तरी मिळती का रं तेवढ्याला ?"

" शेरडीचा मामला येगळा असतो नाना चार-दोन वरसं हिला संभाळावं लागलं. खाऊ-पिऊं घालावं लागलं."

" व्हय पर, पंधरा म्हंजी लईच कमी व्हतेत "

" इसाला करा जा "

" आतां आखीरचं सांगू का ? "

" सांगा की "

" चाळीसाला आसलं तर लाव जा दावं "

" तिसाची आमना हाय वगा माजी आखीरची. द्यावी वाटली तर द्या जा. नग वाटली तर ना द्या "

" दावं लावल्या लावल्या पयसे देत असशील तर दीन की तेवढ्याला वी "

" म्हंजी नगदी आसंल तर तिसाला आन उधारीवर आसंल तर चाळीसाला म्हना की "

" तसंच का समजंनास "

" घोंडीबा मनाशीं विचार करूं लागला. वगार फार फार तर विसाला विकली गेली असती. एखाद्यानं नडवून वगितलं तर विसाला देखील विकली जाण्याची शक्यता नव्हती मग कसं करावं ? विचार करीत असतांनाच त्याची नजर आभाळाकडं गेली. सगळी-कडूनच आभाळ भरून आलं होतं. आणखी भरलं तर तसंच खालीं कोसळेल की काय असं वाटत व्हतं. हवेंत एक प्रकारची उदासीनता भरली होती. ही उदासीनता मनाला देखील स्पर्शून जात होती आतां कोणत्याक्षणीं जोराचा सडका येईल हें सांगता येत नव्हतं. घोंडीबानं एक उसासा सोडला व तात्याबाला तो म्हणाला—

" वरं, द्या दावं लावून "

तात्याबा उत्साहानं उठला. वगारीच्या गळयाला दावं लावलं व वगार त्याच्या स्वाधीन करतां करतां तो म्हणाला—

" इसाराचा रूपाया तरी देतोस का ? "

" घडीभरा देतो "

" आठवणीनं दे वग "

गोड शेवट




"भगवान कृष्णा, शेवटच्या लोकल गाडीची वेळ झालीय···!"

## प्रणयांतील 'विराम-चिन्हें'



भासे चिन्हहि तेचि 'औतरण' हे त्या दृष्टि-भेटींतही ।
होई 'स्वल्पविराम' हा मग तिथे तो नित्य भेटींतही ।।
केव्हां 'अर्धविराम' हा कधिमधीं साधावयां वेळ तो ।
राही तेथहि 'प्रश्नचिन्ह'हि उभे ना साधतां वेळ ती ।।

वेळां एकचि ये वेळोनि बघतां हो 'कंस' तेथे पुरा ।
तो हा 'गोल' कधीं कधीं 'महिरपी' वा 'चौकटी' तो खरा ।।
कंसातीलहि मुग्ध ती अतुरता वाढे इथे सारखी ।
थोडी भीडहि चेपता मग तिथे 'उदगार' चिन्हे मुखीं ।।

हुंकारातचि सम्मती दडवितो तो हा 'अनुस्वार' हा ।
कं ? हास्यातहि तो 'विसर्ग'हि दडे ते एक कोडें महा ।।
कोडें कोण कधीं कसा उकलितो तो एक जाणें मनीं ।
अन्ती 'पूर्णविराम' 'स्पष्ट' दिसतो 'संयोग' होता क्षणीं ।।

—पण्डित महाजन—

कै. रामगणेश गडकरी व श्री. प्रल्हाद केशव अत्रे यांची क्षमा मागून.

" व्हय "

घोंडीबा वगार घेऊन बाहेर पडणार एवढ्यांत हवेंत एकदम गारवा भरला. हुडहुडी भरल्यागत वाटूं लागलं. घोंडीबानं रकटं अधिक घट्ट लपेटून घेतलं. इतक्यांत एक एक्र थेंव तुटूं लागला. घोंडीबानं पावसाचा अंदाज घेतला व दाराच्या आंतल्या बाजूला उभा राहिला. त्याला स्वत:लाहि हुडहुडी भरली व त्याच्या हातांतल्या वगारीलाहि हुडहुडी भरली. घोंडीबा असा कांकडून उभा असतांनाच जोराचा सडाका आला. घरावरच्या पत्र्या-वर थाड्थाड् आवाज उमटूं लागला कानांत देखील तोच एक आवाज बसला. समोर पाहिलं तर धुसरल्यावनी वाटूं लागलं. समोरच्या बुटक्या घरावर, घरावर झुकलेल्या लिंवाच्या आकार त्यांत हरपला— घोंडीबाचा चेहरा अधिकच काळवंडला. पावसानं थोडा वेळ असा हैदोस घातला व नंतर तो मूळ पदावर आला. जात्यांतून पीठ गळावं तसं पाणी गळूं लागलं. घोंडी-बाला बराच वेळ अवघडलेल्या स्थितींत उभा असलेला पाहून तात्याबा म्हणाला—

" असा उभा कंवर न्हातोस ? बस थोडा वेळ "

अभाळांतून गळणाऱ्या पिटाकडं पाहत घोंडीबा म्हणाला—

" नग. पाऊस कमी आलाया. जातो आतां "

" सुगीवर आठवनीनं दे बग पयसे "

" व्हय "

वगारीला ओढीत तात्याबा रस्त्यावर आला. तेव्हां देखील पावसाचं पीठ गळतच होतं. घोंडीबानं खोचा खोवला व वगारीला ओढीत तो चिखलांतून चालूं लागला.

एक रस्ता ओलांडून नामा हेड्याच्या दारांत तो आला व बाहेरून त्यानं हांक मारली.

" कुनी हाय का घरांत ? "

नामा हेडी चितागती घरांत बसला होता. झड लागल्यापासून त्याला घराच्या बाहेर पाऊल ठेवतां येत नव्हतं व बाजारहि बंद झाले होते. वीस गुरं दावणीला बांधून होती. पदरमोड करून त्यांना पोसावं लागत होतं. कितीहि पैसा मोजला तरी गांवात वैरण मिळत नव्हती. स्वत:च्या बैलाच्या तोंडचा चारा काढून द्यावयास कुणी धजत नव्हता. आणि एखादा धजला तरी सोन्याचा भाव तो लावीत होता. त्यामुळं दावणीला बांधलेल्या गुरांना पोसतां पोसतांच तो जेरीला आला होता. आतां या काळजींतच तो बसला होता. एवढ्यांत बाहेरून हांक आली. नामा घाईनं उठला व बाहेर येतां येतां त्याने विचारलं—

" कोन हाय ?"

" म्या घोंडीबा हाय "

नामा हेडी बाहेर आला. त्यानं एकदां घोंडीबाकडं पाहिलं. एकदां त्याच्या हाता-तल्या वगारीकडं पाहिलं. व कपाळावर आठ्या घालीत विचारलं.

" काय हाय "

" ही वगार इकायची व्हती "

" आरं हाय त्येचीच पंचाईत पडलीया मला. अजून त्यांत ही भर कश्याला.

अजीजीनं बोलल्यागत घोंडीबा म्हणाला—

" जमवून देतो की "

" कसंबी दिलं तरी नग मला "

काय करावे हे घोंडीबाला कळेना. पावसाची पिरपिर आणखी चालूंच होती. सुईच्या टोकावनी पाणी गळत होतं. आभाळाचा रंग तर सगळीकडून सारखाच झाला होतां.

त्यानं नामा हेड्याच्या चेहऱ्याकडं पाहिलं.

त्याच्या चेहऱ्यावर वगार घेण्याची चिन्हं दिसत नव्हती. घोंडीबानं मनाशी एक वेगळाच निश्चय केला.

वगारीच्या गळ्याचं दावं काढून घेतलं व तिला नामाच्या वाड्यांत हांकलीत तो म्हणाला—

" आतां व्हय म्हना, अगर, नग म्हना. वगार तुमाला दिलीया. तिचं तुमाला काय द्यायचं आसंल ते द्या जा "

बाहेर पावसाची पिरपिर आणखी चालूंच होती. सुईच्या टोकावानी पाणी गळत होतं आणि घोंडीबा एकदां या पावसा-कडं तर एकदां नामाच्या चेहऱ्याकडं पहात होता . . . . . . . . . . . . .

मुरू मुरू गडणारा पाऊस आणि नामा हेड्याचा चेहरा यांचं गणित मांडण्याची कोशीस करीत होता . . . . . . ●●●







अनुक्रमणिका



*....तेवढ्यांत वीज :चमकून गेली. आसमंतांत कडकडाट झाला. तशी चंद्रा भेदरली....गांगरली अन् तिने चट्दिशी त्याला घट्ट मिठी मारली.... तो बावरला.... आणि मग....*

--सदानन्द सामन्त

# आठवणी

**—सतीशनें** एक वाक्य लिहिलं अन् पुन्हां तें वाक्य खोडलं कथेची सुरवात कशी करावी हें त्यास समजेना. म्हणून तो विचारांत पडला. या कथेचा विषय गेले तीन रात्री त्याला भेडसावत होता. या कथेची कल्पना त्याला तीन रात्रीं छळत होती. ही कथा त्याच्या मनांत फुलारत होती. पण त्याच्या मनासारखी मात्र कागदावर उतरत नव्हती. बरं आज सबंध दिवस पाऊस पडत असल्या-कारणानें तो कुठेंच बाहेर गेला नव्हता. त्याच्या 'इंग्लीश' या विषयाच्या आवडत्या प्राध्यापकाचें व्याख्यान, जानी दोस्त अजित पंडीतची शीळ, अमिता मलकानीचा ट्रॅन्झि-स्टर रेडिओ, फिरोज इराणीची याऽऽहू ची आरोळी हें सर्व त्यास आज चुकलं होतं.

तसं पाहिलं तर त्याच्या कथेची नायिका त्याच्या अगदीं पाहण्यांतली होती. त्याला रोज दिसणारी, त्याच्याशीं मनमोकळे-पणानं हंसणारी, त्याचे चापूनचोपून बसवलेलें केंस विस्कटणारी अन् खरोखरच चिडली असतां 'सत्या, सत्या' म्हणून चिड-वणारी अशी १२–१३ वर्षांची निष्पाप चंदा त्याच्या कथेची नायिका होती. पण कथा मात्र मनासारखी वठत नव्हती. एक दोन वाक्यें लिहिली गेली कीं त्याची लेखणी थांबत असे. खाडाखोड, पुन्हां पूर्ण विराम, प्रश्नचिन्ह पुन्हां मनांतल्या मनांत म्हणायचं कीं पहिल्याप्रथम नवोदित लेखक असेच अडत असतील. या विचारानें मनाचें समाधान करुन तो शून्यांत दृष्टी मिळवत असे. असं तो आज सबंध दिवसभर करत होता. या लिहिण्याच्या खाडाखोडींतच त्याच्या आयुष्याचा एक दिवस खोडला गेला होता. मनांतल्या मनांत विचार करा-यचा, शब्दांची वरात सजवायची, पुन्हा चन्दाचें रूप, हावभाव, चेहरा डोळ्यासमोर आणायचं, शब्दांचा आशय मनाजोगा परि-णाम साधतो कीं नाहीं याची मनांतल्या मनांत फेर-तपासणी करायची, कथा सर्वांग-सुंदर उतरेल ना याची धास्ती बाळगायची अन् नाउमेद झाल्यास मनाची समजूत घालायची असं त्याचं आज सबंध दिवसभर चाललं होतं. आतां यावेळी पण तो विचार करतां करतां स्वतःच्या मनाची समजूत घालू लागला. पावसाचे निगरगट्ट थेंब जेव्हां खिडकीच्या तावदानावर आदळू लागले









अनुक्रमणिका

तसा तो मानावर आला. खोलींत कमालीची शान्तता होती. त्यानें खोलीभर दृष्टी फिरवली. नील हार्वेचा फोटो त्याच्याकडे पाहून हंसत होता. रामकृष्ण परमहंसांचा फोटो त्याच्याकडे निर्विकार दृष्टीनें पाहत होता. खुंटीवर टांगलेली कौंटी कॅप, कोपऱ्यांत उभी असलेली क्रिकेटची बॅट, स्टॅन्डवर ठेवलेलें नवीन 'शूज' हें त्याला चित्रांतल्याप्रमाणें वाटत होतं. त्याची नजर भिंतिवर स्थिरावली. एक झुरळ हळूहळू उतरत पुढें सरकत होतं. तें दिसेनासं होईपर्यंत तो तिकडे पहात राहिला. पुन्हां त्याला आपण लेखक आहोंत याची जाणीव झाली. त्यानें लेखणी सरसावली, पुन्हां विचारांची खोदाखोद केली. पण त्याला कांहीं सुचेना. तो उदास होऊन कपाळाला हात लावून बसला. . . . खरोखरच आपण येथें संपलों कीं काय ? हेंच काय आपलं लेखन ? प्रत्यांत लेखक होण्याची स्वप्नें उराशीं बाळगली ती सर्व भंगणार कीं काय ? भोगलेलं अन् भंगलेलं लिहून साहित्याची सेवा करायची ही आपली इच्छा अपुरीच राहणार काय ? महाराजांपासून ते महारोग्याच्या अंतःकरणांत शिरून त्यांच्या दुःखाला हात घालायचा हें आपण ठरविलं होतं तें कृतींत उतरणार नव्हतं कीं काय ? दुःखांना वाचा फोडायची, स्वप्नांना पंख लावायचं, सुखांना झोके द्यायचे, अन्यायाच्या अस्तित्वाला अस्ताला न्यायचं अन् अश्रुंनां अमरत्व प्राप्त करूं द्यायचं हें सर्व गर्भपात झाल्याप्रमाणें मनांतल्या मनांत मरून जाणार होत कीं काय ?. . . . . .सतीशचं हळवं मन आक्रोश करूं लागलं. त्याला स्वतःच्या विदूवत अस्तित्वाची जाणीव झाली; स्वतःच्या पंगू प्रतिभेची ओळख पटली. एकाएकीं त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. अश्रुसिक्त नजरेनं त्यानें कागदाकडे पाहिलं निस्संग माणूस तप्त वाळूंत पडावा तसं. तो कागद टेबलावर पडला होता. त्या कागदावर निस्सिम प्रेम करणारी ती लेखणी घटस्फोट घेतलेल्या बाईसारखी टेबलाच्या कडेला बसली होती. त्याच्या लेखकी मनांत एक विचार उसळला कीं ती लेखणी उचलावी अन् सरळ दोन्ही डोळ्यांत खुपसावी. खालचा कागद रक्तानें माखवावा. अशोकपुत्र कुणालचे जेव्हां डोळे फोडलें गेलें तेव्हां ज्या वेदना त्यास झाल्या त्या अनुभवाव्या. मग टॉलस्टॉय, मोपांसा नाहीं, चेकॉव्ह नाहीं, डॉस्टॉव्हस्की नाहीं कीं अमक्या अमक्या लेखकाची १०० वी कादंबरी नाहीं. नुसता अंधार. धृतराष्ट्राचें जीवन. . . . .तो खुर्चीवरून उठण्याचा प्रयत्न करूं लागला. पण त्याला उठवेना. पुन्हां तें झुरळ त्याच्या दृष्टीसमोरून हळूहळू भिंत चढूं लागलं. . . . .या झुरळावर सुद्धा कथा लिहिण्याचं माझ्यांत सामर्थ्य असतं तर किती बहारदार झालं असतं ! नवीन विषय, नवीन अनुभूति, नवीन विश्वांत दंग होऊन स्वतःस विसरायचं. प्रत्येक अनुभवानें लेखकाचा पुनर्जन्म होतो. . . तो स्वतःशींच कल्पना करूं लागला. आपल्याला एवढचा जर कल्पना सुचतात तर चन्दाच्या बाबतींत आपली कल्पनाशक्ति पांगळी कशी होते ?. . .तो विचारांत पडला,; तसाच धुंदींत उठला अन् खिडकीकडे आला. बाहेर पाऊस कोसळत होता. समोरच सुरुचं उंच झाड लहान मुलानं पावसांत भिजावं तसं पावसांत भिजत होतं. रस्त्यावरच्या दिव्याच्या प्रकाशांत पावसाच्या रेघा स्पष्ट दिसत होत्या. जवळच्या वडाच्या झाडाखाली डोक्यावर पदर घेऊन कोणीतरी स्त्री आडोशासाठीं उभी होती,; पाऊस केव्हां थांबेल याची वाट पहात उभी होती. कोण असेल ती ? निवारा की प्रतिक्षा? पाऊस केव्हां जातो याची वाट पहाणं कीं कुठल्यातरी व्यक्तीची वाट पहाणं ? ती स्त्री कशी दिसत असेल म्हणून तो तिच्याकडे बारकाईनें पाहूं लागला. . . .कदाचित् ही स्त्री पण आपल्या आगामी कथेची नायिका होईल. . .

त्याला मागील वर्षाच्या पावसाळ्याची आठवण झाली. ती मुलगी आठवली. काजळी पातळांत स्वतःचें अलौकिक सौंदर्य भिजवत ती त्याच्या घराच्या आडोशाला आली होती. किती तरी वेळपर्यंत पाऊस कमी होईना. तशी ती नंतर भिजतच जाण्यास निघाली. ती अज्ञात मुलगी सतीशच्या पहिल्यावहिल्या कथेची नायिका बनली होती. आणि तिच कथा कथा-स्पर्धेत पहिली आली. सतीशचं नांव वाचकांच्या नजरेसमोर आलं. अंधारांत चांचपडणारा सतीश प्रकाशांत आला. वाचकांनी त्याची वाखाणणी केली. टीकाकारांनी त्याचा उदोउदो केला. शब्दांचें अवडंबर न माजवितां, भाषेचं स्तोम न उभारतां एका उदयोन्मुख लेखकानें कथेच्या विषयास निर्भयपणें भिडण्याची शिकस्त केली म्हणून सतीशचा गौरव झाला. ती कथा वाचकांच्या दीर्घकाळ स्मरणांत राहिली. त्याप्रमाणेंच ती मुलगी सतीशच्या स्मरणांत रेंगाळत राहिली. सतीशनें त्या नायिकेचा पुष्कळ शोध केला. पण ती त्यास कधींच भेटली नाहीं. जणूं ती मुलगी त्या कोसळणाऱ्या पावसांत वाहून गेली. सतीशला त्या मुलीची आठवण आतां व्यथित करूं लागली. . . .मनाला वेड लावणाऱ्या व्यक्ति पुन्हां कधींच कशा भेटत नाहींत ? एकदांच भेटतात अन् लाखों वेळां भेटल्या पाहिजेत म्हणून मनाला चुटपुट लावून जातात. तिला काय कल्पना कीं माझे निःश्वास, माझी स्पंदनं, माझ्या हृदयांतील धडधड, माझ्या अर्धनिद्रित रात्री या सर्वांनीं तिच्यावर खडा पहारा केला होता म्हणून ! तिला काय कल्पना कीं माझी लेखणी. . . . . .

सतीशला वाटायला लागलं कीं पुन्हां ती अज्ञात मुलगी दिसावी. पुन्हां पावसांतून भिजत, भिजत निथळत जावी. एखाद्या स्वप्नासारखी, एखाद्या आशेसारखी, एखाद्या कथेच्या विषयासारखी. . . .हळूहळू त्याची नजर सुरुच्या झाडावर वळली. तें झाड पावसांत भिज भिज भिजत होतं. त्या झाडाच्या बाजूचें एक झुडुप पावसाच्या माऱ्यानें अगदीं लवून गेलं होतं. त्याच झुडुपावर एक किडा कर्कशपणें ओरडत होता. तो कर्कशपणा सहन न होऊन सतीशनें पुन्हा त्या रस्त्यावरच्या वडाच्या झाडाकडे दृष्टी फेंकली. डोक्यावरून पदर घेणारी ती स्त्री तिथें नव्हती . . .म्हणजे पावसांत भिजतच ती निघून गेली होती. माझ्या पहिल्या कथेच्या नायिकेप्रमाणं. . .त्या अज्ञात मुलीची पुन्हां आठवण होतांच तो गहिंवरला. तेवढचांत दूरच्या रस्त्यावरून फटफटीचा अस्पष्ट आवाज ऐकूं येऊं लागला. तो







तुमच्या पॅन्ट्स्
टिनोपालच्या अधिक शुभ्रतेमुळें चमकदार होतात.
Tinopal






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका

दचकला. मुंवया उंचावून आवाजाच्या दिशेकडे पहात राहिला.....अमर तर नाहीं ना? अमरच असेल तो....थोड्यावेळानें बंगल्याच्या मुख्य दरवाज्यांतून फटफटी आंत आली. या बंगल्याच्या मालकाचा नवीन लग्न झालेला मुलगा बायकोसह मागें परतला होता. फटफटी थांबली. अमरची बायको पातळ अन् रेनकोट सांवरत उतरली. आणि दरवाज्यांत आली. तिच्या मागोमाग तो पण घरांत शिरला. पुन्हां तो रस्ता शांत झाला....तें वडाचें झाड....तो रस्त्याच्या कडेचा दिवा....तो रस्ता....मी मात्र येथेंच आहे. दोन तीन तासापूर्वी मी याच मनाच्या स्थितींत होतों. कथा साकारच होत नव्हती. असं कां? अन् मी तर मोठा लेखक झाल्याचीं स्वप्नें रंगवित होतों. १०० वी कथा....२०० वी कथा...३०० वी कथा मी लिहितच आहे. लिहितां लिहितां मृत्यु यावा याचा ध्यास घेतला आहे.....'सतीश इनामदार, तुमच्या मनाची व्यक्तीच आम्हांस समजत नाहीं. एवढया कथा लिहितां तरी कशा ?...वाचकांचीं पत्रें मला येत आहेत... त्या पत्रांमुळेंच दुप्पट उत्साहानें मी लिहित आहे....नव्या दमाचे, नव्या रक्ताचे लेखक येतील....एक प्रचंड लेखकांची लाट उसळेल... पुन्हां दुसरी लाट ...पुन्हां तिसरी लाट..तरीपण वाङमयांतील माझें स्थान तसंच राहिल. सागरांतल्या दीपगृहाप्रमाणें... अमर, चिरंजीव, युगानुयुगें ज्यांचें वाङमय वाचलें जाईल त्या लेखकांच्या पंक्तींत मानानें बसेन...अक्षय किर्ती, अक्षर साहित्य ..खरंच असं होईल कां?....तो स्वप्नरंजनांत मशगुल झाला. केव्हांतरी मागें परतून पुन्हां खुर्चीवर येऊन बसला. तो खोडाखोड झालेला कागद पहातांच त्याचें काळीज गळाठलं. आपण खरे कोण आहोंत याची त्याला जाणीव झाली. सतीश इनामदार. महाविद्यालयांत द्वितीय वर्षाला शिकणारा सतरा वर्षांचा तरुण....मोठा लेखक होण्याचीं स्वप्नें जोजविणारा एक अननुभवी तरुण.....अमर साहित्याचा ठेवा मागें ठेऊन ज्ञानेश्वरानें बावीसाव्या वर्षी समाधि घेतली. किटस् सव्वीसाव्या वर्षी या जगांतून उठून गेला. अन् आतां सतरा वर्षांचा मी आपल्या हांतून कांहींतरी अद्वितीय असं लिहिलं जावं म्हणून स्वतःशींच धरणं धरून बसलों आहे; वर्तमानकाळाशीं मिळतंजुळतं न घेतां कालाच्या प्रचंड ओघांत तरंगत रहाण्याचा प्रयत्न करत आहे. कदाचित् यांत माझा पराभव होईल. किंवा जीत पण होईल....

सतीश पुन्हां नव्या जोमानें लिहिण्यास बसला. जुना कागद टरकावून त्यानें नवीन घेतला. एखाद्या महान् शास्त्रज्ञानें आपल्या प्रयोगशाळेंत नजर फिरवावी तशी त्यानें त्या कागदावरून नजर फिरविली....याच कागदावर चन्दाची प्रतिमा चितारली जाणार आहे. कोणी सांगावं कदाचित् माझ्या पहिल्या कथेप्रमाणें ही कथा पण एक साहित्याचं लेणं ठरेल. मान-सन्मान घेऊन येईल. लोकमान्यता पायाशीं आणील...

सतीश या विचारांसरशीं उत्साह आला. कांहींतरी दिग्वीजयी करावं असं त्याला वाटायला लागलं. मग त्याला किती कष्ट पडले तरी हरकत नाहीं, त्याला किती मोल द्यावं लागलं तरी बेहत्तर. म्हणून तो दुप्पट उत्साहानें पुन्हां लिहिण्यास बसला. लेखणीला त्यानें कुरवाळलें. कागदावर त्यानें ओंठ टेकले अन् गंभीर मुद्रेनें तो परमहंसांच्या फोटोकडे पहात राहिला. त्या तेजःपुंज चेहऱ्यानें त्याला आशिर्वाद दिला. त्याला स्फुरण चढलें. निर्धारानें त्यानें लेखणी घेतली अन् तो लिहिण्यास लागला. तेवढयांतच दरवाज्यावर थाप पडली. सतीश चडफडला. आपली कथा अपुरी राहणार या विचारानें हळहळला... पण यावेळीं माझ्या खोलीवर कोण आलं असेल? रात्रींचे नऊ तर वाजून गेले आहेत. कॉलेजांतील मित्र यावेळीं तरी येण्याची शक्यता नव्हती. मग कोण? खानावळींत ओळख झालेला काटदरे? सर्क्युलेटिंग लायब्ररी काढावी म्हणून फी मागणारा दाढीवाला पोतनीस कीं...एखादी तरुणी...आसऱ्यासाठीं....निवाऱ्यासाठीं...कीं कुणीच नाहीं. वीज चमकावी तसं एक वर्षापूर्वी भेटलेल्या अन् पुन्हां त्याला कधींहि दर्शन न देणाऱ्या त्या तरुणीचा चेहरा डोळ्यांसमोर चमकला. त्याचें सर्वांग शिरशिरलं.

पुन्हां दरवाज्यावर थाप बसतांच तो भानावर आला; वैतागत उठला अन् दरवाज्यावर आला. बाहेरचा माणूस कोण असावा याचा अंदाज घेत घेत त्यानें दरवाज्याची कडी ओढली. पण दरवाजा उघडला गेला नाहीं. बाहेरून कुणीतरी कडी लावली होती. सतीश संतापला अन् खुर्चीवर येऊन बसला. पुन्हां दरवाजावर कुणाची तरी बोटं टिकटिकलीं. त्याच्या कपाळाला आंठ्या उमटल्या. लेखनांत व्यत्यय आणणारी ही व्यक्ती कोण हें त्यास समजेना. म्हणून तो ओरडला, "कोण आहे?" पण बाहेरून कोणताच प्रतिसाद निघाला नाहीं. म्हणून तो पुन्हां लिहिण्यास बसला. पण खाली मान घालणार तितक्यांतच दरवाजावर पुन्हां कोणी थाप मारली. मुद्दामच तो बसून राहिला. जसजसा वेळ जाऊं लागला तसतशी त्याला त्या व्यक्तिची उत्कंठा वाटायला लागली. बाहेरची व्यक्ति कोण? कशासाठीं या पावसांत ती व्यक्ती माझ्याकडे आली असेल? कशासाठीं?... पण 'सतीश, सतीश' हा आवाज ऐकतांच त्याची समाधि भंग पावली...हा चन्दाचा आवाज. बाहेर चन्दा उभी असावी तर ....तो स्वतःशींच हंसला. एवढया रात्रीं चन्दा कशाला आली हें त्यास कळेना. बाहेर पाऊस कोसळत होता. सतीश खोलींत गारठत होता. अन् बारा, तेरा वर्षांची चन्दा बाहेर उभी होती. त्याला वाटायला लागलं कीं कांहीं केल्या दरवाजा उघडू नये, तिला तसंच बाहेर उभं करावं. पण लगेच दुसरा विचार त्याच्या मनांत आला कीं, दरवाजा उघडून तिला आंत घ्यावें, न जाणों, तिच्या सहवासामुळें, तिच्या हास्यामुळें, तिच्या बोलण्यामुळें या कथेला जोर चढेल, गति मिळेल. तिचें आगमनच या कथेची सुरुवात असेल. तत्क्षणींच तो उठला. त्याच्या तारुण्याचा घोडा चौफेर उधळला अन् दंगामस्ती करूं लागला. रोमांचित शरीरानें तो दरवाज्याकडे आला अन् त्यानें दरवाजा उघडला. गंभीर होऊन तो पटकन् बोलला, "चन्दा! तूं!"

चन्दा हंसली. तिच्या निरामय हास्यानें पाऊस थांबला आहे असं त्याला वाटलं.

अनुक्रमणिका

"हंसतेस काय! बाहेरून दरवाज्याला कडी कशाला लावलीस?" सतीश जरा रागानेंच बोलला. चन्दा डोळे बारीक करून मोठ्यानें हंसायला लागली. तिचं हंसणं सतीशला उगीचच लागलं. तिचा गालगुच्चा घेऊन तिला रडवावं असं त्याला वाटलं. पण तितक्यांतच "मला खोलीच्या बाहेर ठेवणार आहेस की काय!" असं पुटपुटत ती त्याच्या अंगावरून बेधडक खोलींत शिरली, आपल्याच खोलींत शिरावी तशी......वर्गांत शिरावी तशी. सतीशचं अंग उगीचच थरथरलं; घशाला कोरड पडल्यासारखी वाटली. मुकाट्यानें त्यानें दरवाजा बंद केला अन् तो खुर्चीवर येऊन बसला. टेबलाच्या बाजूला चन्दा उभी राहिली. टेबलावर पडलेल्या कागदाकडे फुललेल्या गुलाबाकडे पहावं तशी ती पहात राहिली.

"अजून झोंपलीस नाहीं तूं चन्दा?" सतीशनें आपले दोन्ही हात त्या टेबलावर ठेवत विचारलं.

"हल्लीं मला उशीरापर्यंत झोंपच येत नाहीं." ती पाठीवरची वेणी पुढें काढत म्हणाली. तिच्या खांद्यावर आलेल्या कोमेजलेल्या गुलाबाकडे सतीश पहात राहिला.... कोमेजलेलं गुलाबाचं फूल. अशीच चन्दा केव्हां तरी गुलाबासारखी फुलेल अन् कोमेजून जाईल. तिला पुढील आयुष्याची काय कल्पना? तिला फूल फुलतें हें माहित आहे पण भ्रमर त्याच्याभोंवतीं गुंजारव करतो हें तिला कुठें माहित आहे? चैत्रांतील कोकिळेचें कूजन तिनें ऐकलं असेल. पण ती कां कुहुकुहू करते हें तिला कुठें माहित आहे? अमावास्येच्या काळोखानें काळवंडलेली रात्र तिनें पाहिली असेल. पण ती रात्र आशावादानें पहांट होण्याची वाट पहाते हें तिला कुठें माहित आहे? ती अनभिज्ञ आहे म्हणून तर या समयीं माझ्या खोलींत आहे. ती अस्पर्श आहे म्हणून तर माझ्या नजरेला बेडरपणें नजर देते. ती अज्ञान आहे म्हणून तर अशा गारठलेल्या रात्रीं... आणखी दोन तीन वर्षांनी ही माझ्याशीं निर्हेतुकपणें हंसणार नाहीं, बोलणार नाहीं, माझे केंस विस्कटणार नाहीं, मला 'सत्या, सत्या' म्हणून चिडविणार पण नाहीं. अन् मी तरी त्यावेळीं कुठें असेन कोण जाणे? कुठल्या कथेचा पाठलाग करत, कुठली व्यथा हृदयांत चिणून घेऊन, कुठल्या स्वप्नांच्या मागें, कुठल्या ध्येयांच्या मागें? ...पुढेंमागें मात्र हें सर्व आठवत राहणार....ती निथळत निथळत भिजत गेलेली अज्ञात तरुणी....झाडाखाली थांबलेली ती स्त्री....चळवळी चन्दा...चन्दाचें कोमेजलेलं फूल अन् ही कांकडणारी, गारठणारी पावसाळी रात्र...सतीशचे विचार चौफेर उधळले. पण आज सबंध दिवस विचार राबवून गोष्ट जमली नाहीं म्हणून त्याला टोंचणी लागली. तो बाजूस चन्दा आहे हें विसरला. चन्दाचा पाय लागताच तो भानावर आला.

"गोष्टीबद्दल विचार करतोस ना सतीश?" तिनें आपले आयताकृति डोळे तसेच ठेवत त्याला विचारलें.

"कसली गोष्ट?" सतीशनें बावचळून विचारलें.

"मला माहित आहे सतीश तूं गोष्टी लिहितोस त्या!" ती कागदावर हात फिरवीत म्हणाली.

"तुला कसं माहित?"

"मला कसं माहित म्हणजे? मला सुलभाताईनें सांगितलें. तिला तुझी ती बक्षिसाची गोष्ट फार आवडली."

"सुलभाताईनं तुला तसं सांगितलं?" सतीश आनंदातिशयानें वेडा होऊन बोलला.

"हां पण सुलभाताईनें तुला तसं सांगितलं नाहीं?" चन्दानें डोळे चमकावित विचारलं.

सतीश गप्प राहिला. ती लाजरी मुलगी सतीशबरोबर काय, बोलणार होती? सतीश गेलीं दोन वर्षे 'पेईंग गेस्ट' म्हणून या बंगल्यांत होता. पण सुलभा सतीशबरोबर एकवेळ पण बोलली नव्हती की हंसली नव्हती. तिच्या वागण्याचें सतीशला नेहमी आश्चर्य वाटत असे. अन् आपलें तारुण्य फुकट जात आहे याची टोंचणी लागत असे. एकदां त्यानें तिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला होता. पण...पण..तिच सुलभा त्याच्या डोळ्यासमोर त्याची गोष्ट



'ड्राप पडद्यानं घोटाळा केला आज....!'

वाचत आहे म्हणून उभी राहिली. त्या कथेचं शीर्षक त्याच्या डोळ्यासमोर चमकलं. आगगाडी धांवत जावी तशीं 'लेखक सतीश इनामदार' ही अक्षरें त्याच्या नजरेसमोर धांवली. त्याला स्वतःचाच अभिमान वाटला. त्यानें केंसावरून हात फिरवला अन् खिडकीतून पाहिलं.

"सतीश, मला एखादी गोष्ट सांग रे." शाईची दौत उघडत चन्दा म्हणाली.

"कसली सांगू?"

"कसलीहि सांग."

"राम-लक्ष्मणाची सांगू?"

"ती मी ऐकली. दुसरी सांग."

"एक होती चिमणी अन्...."सतीश हंसत हंसत बोलला पण. तेव्हढ्यांतच चन्दा म्हणाली, "ही गोष्ट ऐकायला आतां मी काय लहान आहे? दुसरी कसली तरी सांग."

"ही गोष्ट ऐकायला काय तूं मोठी झालीस?" सतीशनें तिला विचारलें.

"मग मी मोठी नाहीं झालें?" ती सतीशच्या डोळ्यांत सरळ सरळ पहात बोलली. सतीश तिच्याकडे पहात राहिला. चन्दा अजुन लहान होती. अजुनहि कुठलेच भाव तिच्या डोळ्यांत तरळत नव्हते. अजुनहि कुठलीच वासना तिच्या मनांत उगवली नव्हती. अजुनहि तिच्या छातीवर वासनाच्छादित शिखरं उमटली नव्हती. मग पाठलाग, डावपेंच, बोलण्यांतील खोंच, द्वर्थी अर्थाची टिंगल हें सर्व तिला कुठें माहित असणार? तरी देखील सतीशला आतां कसंतरीच वाटायला लागलं. एकदांच भेटून पुन्हां दर्शन न देणाऱ्या तरुणीबद्दल




**आपल्याच एकेक पै जमविण्यावर देशाची शस्त्र सामुग्री उभी राहूं शकते. भारताच्या संरक्षण रोख्यांत अधिकाधिक पैसे गुंतवणे आपले कर्तव्य आहे.**

हळहळ, झाडाच्या आडोशाला राहून मनांत तरंग उठवणारी ती अज्ञात स्त्री, कधींच न बोलणाऱ्या सुलभाची कथा आवडली म्हणून उर भरणारी ती वाखाणणी अन्...अन् समोर तर चन्दा उभी होती. अनभिज्ञ अन् अस्पर्श अशी. पिवळा जर्द फ्रॉक नेसलेली, कानांत सोन्याची गोलट भूषणं असणारी, हस्तीदंती कांतिची निष्पाप चन्दा....त्याला वाटायला लागलं.. ....त्याला वाटायला लागलं तेव्हढ्यांतच चन्दा गाल फुगवत बोलली,

"गोष्ट सांगत नाहीं ना तूं?"

"कसली गोष्ट सांगू, तुला चन्दा! माझीच गोष्ट पूरी होत नाहीं अगोदर." सतीश कष्टी होऊन म्हणाला.

"तें कांहीं मला सांगू नकोस. अगोदर मला गोष्ट सांग," चन्दा जमिनीवर पाय आपटीत बोलली.

पाऊस मन्दावला होता, पण वारा जोरानें सुटला होता. अधुनमधुन वीजा चमकत होत्या. वादळ होणार हें सतीशनें जाणलें. ही संधि साधुन तो तिला म्हणाला,

"चन्दा, आतां वादळ होणार आहे. तूं झोंप जा."

"होऊं देत जा वादळ!" ती रुसून म्हणाली.

रात्र संपत चालली होती. सतीशची कथा पुरी होण्यास कित्येक तास तरी लागणार होते. अन् समोर तर त्या कथेची चालती बोलती नायिका उभी होती. रागावलेली अन् रुसलेली. सतीश जरा विचारांत पडला. सतीश विचारांत पडलेला पाहून ती धमकीच्या स्वरांत बोलली,

"गोष्ट सांगत नाहीं ना? थांब आत्तांच्या आत्तां शाई सगळी सांडून टाकते." असें म्हणून तिनें शाईच्या दौतीकडे हात झेंपावला. पण शिताफिनें सतीशनें तिचा हात झटकला. चन्दा भेदरलेल्या नजरेनें त्याच्याकडे पहात राहिली. एवढ्यांत वीज चमकली अन् सगळं आसमंत उजळून गेली. पाठोपाठ कानठळ्या बसवणारा विजेचा कडकडाट झाला. भेदरलेल्या अन् बावरलेल्या चन्दानें भितीनें सतीशला मिठी मारली. काय झालं तेंच सतीशला समजलं नाहीं. फक्त तिच्या उजव्या कानाच्या भूषणाची थंडाई त्याच्या गालाला जाणवली. त्याचें सर्वांग ताठरलेल्यासारखं होतं न होतं तोंच चन्दा मिठी सोडवून खारीसारखी पळून गेली. सतीश भयचकित होऊन आजूबाजूस पाहूं लागला.

दरवाजा वाऱ्यानें आपटत होता. बाहेर वारा घोंगावत होता. वरचा दिवा गरगारा फिरत होता. रामकृष्ण परमहंस, नील हार्वे यांच्या तसविरी लटालटा कांपत होत्या. खुंटीवरची कौटी कॅप कोंपऱ्यांत जाऊन पडली होती. वाऱ्याच्या झोतानें आलेल्या पाण्यानें स्टॅन्डवरचे नवीन 'शुज' भिजले होते. कांहीं क्षणापूर्वी चन्दा येथें होती कीं नाहीं हें तो आठवायचा प्रयत्न करूं लागला. त्यानें डोळे मिटल्यासारखें केले..ती पावसांतून भिजत गेलेली देखणी मुलगी... वडाच्या झाडाला आडोशाला राहिलेली ती अज्ञात स्त्री...फटफटीवरून आलेलं नवीन लग्न झालेलं जोडपं...चन्दा...चन्दाचें कोमेजलेलं गुलाबाचं फूल...सुलभा...रामकृष्ण परमहंस, नील हार्वे यांच्या लटलटणाऱ्या तसविरी...कोपऱ्यांत पडलेली कौटी कॅप....भिजलेलें नवीन 'शुज'...सतीशनें अर्धवट डोळे उघडलें. मागच्या जन्मींचं आठवल्या सारखं त्याला वाटलं. संवेदनेच्या हजारों सुया त्याला टोंचल्या. कांहींतरी अद्वितीय असं त्याला सुचायला लागलं. हळूहळू चन्दाची प्रतिमा मनःपटलावर खोदली जाऊं लागली. त्यानें त्या धुंदीतच लेखणी हातांत घेतली अन् तो अनुभवाच्या जोरावर चन्दाची कथा बेधडक कागदावर साकार करूं लागला.

●●●

अनुक्रमणिका

# हरिभाऊ आपटे आणि स्त्रीजीवन

--डॉ. सरोजिनी बाबर



हरिभाऊंचें एक दुर्मिळ चित्र



**जुन्या** काळच्या वास्तूंच्या दर्शनानें कधीं कधीं माणसांच्या चित्तवृत्ति हेलावून जातात आणि गतकालीन इतिहासांत त्याचे मन दंग होऊन जातें. अशा वेळीं भूतकालाबरोबरच वर्तमान आणि भविष्य कालाचेंहि कांहीं धागेदोरे त्याच्या मनांत घोळत असतात. आणि मग त्यांतलें नेमकें कोणते उल्लेखनीय ठरेल या संबंधीं त्याला निर्णय घेणें जड जातें. क्षणभर तो भांबावूनहि जातो आणि कालाय तस्मै नमः अशी त्याची अवस्था होते. निदान माझ्याबाबतीत तरी परवा असें घडलें खरें.

त्या दिवशीं मी पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयाहून अप्पा बळवंत चौकाकडे पायी चाललें होतें. आणि माझ्या आवतीं भोंवतीं चाललेल्या तरुण मुलींच्या घोळक्यांतून पुढील बोलणें माझ्या कानावर येत होतें.....

"अय्या, किती ग बावळी तूं उषे ? इश्य ! आंबाडा काय घालतेस न् हे नउवारी काय नेसतेस ? हं ! मला नाही हे आवडत तुझं. दे सोडून हे फॅड्."

"अग बा ! म्हणे दे सोडून. दिसूं दे की आजीबाई. पगडीवाला नवरा मिळेल तेव्हां कळेल मग."

"वा ! नवरा कुठं पोषाखावरून मिळतो वाटतं ?"

"आणि हें असं इतकं नखरेल वागणं चांगलं वाटतं तुझं ? बिनबाह्यांचे ब्लाऊझ घालून न् खुशाल चोळी सारखं लांडं पोलकं घालून फिरतेस ! लाज नाहीं वाटत मी म्हणतें ? आणि केसांचे तरी नखरे किती हे रोजच्या रोज ? जसा काय एवढाच उद्योग हिला असं कुणी म्हणावं ! इश्य ! लिपस्टिक ग कशाला हवी ती मेली ? जशी काय आत्ता परदेशांतूनच आलीय हं अगदीं !"

"हं ! ज्याची त्याची खाजगी गोष्ट आहे ही. तुला बोलायचं कारण ? पुन्हां बोलशील तर पहा हं ! माझं मी पाहून घेईन–"

"जाऊं दे ग. करेल तो निस्तरेल. आपल्याला का नसती पंचाईत ?".....

त्यामुळें हरीभाऊ आपटयांच्या आनंदाश्रमाजवळ माझे पाय घोटाळत होते. वाटत होतें कीं, हरीभाऊंच्या कानावर हें बोलणें गेलें तर त्यांची लेखणी कोणत्या शब्दांनीं या गोष्टीला वाचा फोडील ? त्यांच्या वेळच्या स्त्री जीवनापेक्षां हें आजकालचें सुधारणेंत मोडणारें स्त्रीजीवन त्यांना कसें वाटेल ? सुसंस्कृत झालेलें की मागासलेलें ? काय होईल त्यांची प्रतिक्रिया ?

माझ्या मनांत असल्या विचारांनीं घुमाकूळ घातला असतांना मी आनंदाश्रमाच्या दाराशीं थांबलें. नम्रभावानें त्या वास्तूला प्रणाम केला आणि विचारलें, "हे भव्य प्रासादा, तुझ्या अंगाखांद्यावर बागडलेल्या हरीभाऊंचे दर्शन पुन्हां एकवार घडवशील का ? त्यावेळच्या तुझ्या अंगणांतील पाळीव पशुपक्षांनीं नटलेल्या व फुलांच्या ताटव्यांनीं सुगंधित झालेल्या तुझ्या अंगणांत येणाऱ्या पाणी पित्या मुलांना अडविणारा भय्या या आतांच्या पोरींना असलें बोलत इथें प्रवेश करतांना अडवील की आंत सोडील ? खरं सांग–आणि त्या मुलांचं बोलणं ऐकून हरीभाऊ तुझ्या वरच्या मजल्यावरून खालीं धांवत आले व इथेंच पाणी प्यायला कां यावं हीं त्या मुलांनीं दिलेलीं उत्तरं ऐकून सुखावले तसं कांहीं घडेल का याहि बाबतीत ? आईच्या भावनेनं माखलेलं त्यांचं अंतःकरण या मुलींच्या अशा विचारांना जवळ करील का लाथाडील ? सांग–बोलत का नाहींस ?"

पण त्या वास्तूनें माझ्या बोलण्याला उत्तर दिलें नाहीं. त्यानें











अनुक्रमणिका

## हरिभाऊंची लाडकी 'ताई'



हरिभाऊंना एकुलती एक कन्या होती. तिचें नांव शांताताई. हरिभाऊ तिचा वर्षांतून एकदा 'बालक दिन' करीत. त्यादिवशीं तिच्या सर्व बालमित्रांचा मेळावा भरे. पण ताई फार अशक्त होती. ती हुषार होती. मित्रमंडळींत मिसळण्याची तिला, विलक्षण आवड होती. हरिभाऊंनी तिला लिहिणें व वाचणें शिकविलें. प्रथम ती टंगळ मंगळ करी. मात्र नंतर तिला वाचनाची इतकी गोडी लागली कीं इसापनीति घेऊन ती तासचे तास वाचीत बसें. तिला दोन्ही हातांनीं लिहितां येत असे. तिच्या मातापित्यांनी तिच्याबद्दल केवढे मनोरथ रचले होते! पण ताई सातवें वर्ष संपतें न संपतें तोंच देवाघरीं गेली. हरिभाऊ तर तेव्हांपासून खचले ते कायमचे! तिच्या मृत्यूनंतर चार वर्षे त्यांनीं म्हणण्यासारखें लेखन केलें नाहीं. शिवाय ताईला आवडणारी अंबा, केळें ही फळें व चहां, कढी सारखी पेयें....यांचा त्यांनी अखेर पर्यंत त्याग केला.

फक्त एक सुस्कारा सोडल्याचा मला भास झाला. आणि म्हणून मी आपल्याशींच अंदाज बांधला की, हरिभाऊंचें उत्तर या कारणानें मिळेल तें असें असेल की, "या मुलींच्या विचारांना स्थैर्य लाभलेलं नाहीं. त्यांचीं मतें अपक्व आहेत. त्यांच्या मनावर कुणीतरी आपल्या संस्कृतीचा संस्कार घडवणं अगत्याचं आहे. त्यांची दिशाभूल होता कामा नये. त्यांच्या नजरेसमोर कांहीं ध्येयवाद हवा आहे."

माझ्या मनाशीं ही खूणगांठ मी बांधीत असतांनाच पुण्याच्या स्कूल बोर्डाचे चेअरमन म्हणून हरिभाऊंनीं केलेली कामगिरी मनांत भरत गेली. भांबुर्ड्याच्या शाळेला अचानक भेट दिल्यावेळीं त्यांना दिसून आलेली अव्यवस्था त्यांनीं "आज दुपारी तीन वाजतां अकस्मात येऊन शाळा तपासली. थोडीशी अव्यवस्था दसली. मुलांच्या अभ्यासाकडे शिक्षकांचे याहून अधिक लक्ष असले पाहिजे. कुंड्यांतील झाडें वाळत चालली आहेत. त्यांना रोजच्या रोज पाणी घालण्याची व्यवस्था झाली पाहिजे." अशा शब्दांनीं शाळेच्या शेरेबुकावर नमूद केली. आईच्या मायेनें झाला अपराध पोटाशीं धरून गोड शब्दांत त्यांनीं गैरव्यवस्थेला सुधारण्याचा प्रयत्न केला. तीच गोष्ट ते आजकाल संक्रमणावस्थेंतून जाणाऱ्या स्त्री जीवनाच्या दृष्टीनें करू शकले असते असें मला तीव्रतेनें जाणवलें. म्हणून मी स्वतःशींच बोलून गेलें कीं, "भोंवताली रोज घडणाऱ्या गोष्टींची मदत घेऊन अद्‌भुतरम्य वातावरणाइतकेंच आकर्षक वातावरण उभें करून हरिभाऊंनीं आपल्या कादंबरी लेखनाला जें नवीन वळण दिलें तें आज या घटकेला ते हयात असते तर भारीच मनोहारी रीतीनें रंगत गेलें असतें. त्यांची कादंबरी आजच्या काळांतहि वैशिष्टपूर्ण ठरली असती. स्त्री जीवनाचें वास्तव चित्रण त्यांच्या लेखणीनें प्रामाणिकपणानें केलें असतें."

हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्यांमधून रंगविलेलें स्त्रीजीवन हें वास्तव होतें. त्यावेळचें स्त्रीजीवन कसें होतें व तें कसें असावयास पाहिजे हें त्यांनीं सुचविलें होतें. स्त्रियांना लिहितां, वाचतां आलें पाहिजे असें त्यांचें सिद्धांतवजा म्हणणें होते. त्यामुळें त्यांनीं आपल्या 'मधली स्थिती' या कादंबरीमध्यें यमुनेला लेखनवाचनाचे धडे देणारा विष्णु रंगविलेला आहे व नवऱ्याबरोबर वाचन वाढवून धीट बनलेली यमुना विविध विषयांवर चर्चा करतानाहि दाखविली आहे.

आजकाल हरिभाऊंची ही अपेक्षा बरीचशी सुफल होत चालली आहे. अशिक्षित स्त्री सुशिक्षित होत चालली आहे. साक्षरतेचें प्रमाण वाढत आहे आणि एखादी सभा ही नवसाक्षर स्त्री चालवू शकत असल्याचीं दृश्यें दिसू लागली आहेत. एवढेंच नाहींतर "आजची सभा आपण स्वीकारावी" अशा प्रकारचें आवाहनहि ती पुरुष माणसांना अध्यक्षपदीं बसवितांना करूं लागली आहे.

सध्यांचा काळ हा स्त्रीजीवनाच्या दृष्टीनें अत्यंत क्रांतिकारक असा आहे. ग्रामीण भागांतील स्त्री साक्षर होते आहे. पंचायत समितीमध्यें जाऊ लागली आहे. पंचायत समितीच्या अध्यक्षपदाचीं सूत्रें देखील हातीं घेऊं लागली आहे. आणि शहरांतील स्त्री शिक्षणाच्या हरएक प्रांतामध्यें प्रवेश करून पदवीधर होते आहे. वैद्यकीय व्यवसाय, प्राध्यापकाचा व्यवसाय ती हौसेनें करूं लागली आहे. शेंकडों मुलीबाळी लेखनिकांचीं कामें करीत आहेत. कांहींजणीं विधानसभेंत व लोकसभेंतहि निवडणुका लढवून निवडून येत आहेत, मंत्री होत आहेत व राजकीय संस्थांतून चिटणिसाची व अध्यक्षपदाचीहि भूमिका पार पाडीत आहेत. कोणी राज्यपालहि झाल्या आहेत तर कोणी यूनोच्या अध्यक्षाची महत्त्वाची भूमिकाहि पार पाडू शकल्या आहेत. साहित्याच्या क्षेत्रांत नामवंत लेखिका व कवयित्रीहि नांवारूपाला आल्या आहेत. फार काय मोटर ड्रायव्हरचा व्यवसाय आणि विज्ञानक्षेत्रांतील संशोधनाचें कार्यहि त्या आतां करू लागल्या आहेत.

परंतु असें असूनहि आमच्या स्त्रियांनीं अजून शिकावयाचें आहे असें मला वाटतें. हरिभाऊंच्या यमूनेप्रमाणें (मधली स्थिति) स्त्रियांनीं साक्षर झालें पाहिजे असें म्हटलें नाहीं तरी खऱ्या अर्थानें स्त्रीनें स्त्री म्हणून जगलें पाहिजे असा आजचा युगधर्म होऊन

अनुक्रमणिका

वाला आहे. झपाट्यानें बदलणाऱ्या आजच्या युगामध्यें स्त्रियांनी घराबाहेरच्या विश्वांत रममाण होतांना आपलें घर विसरूं नये अशी आजची सामाजिक मनोधारणा होत चालली आहे.

'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरीमध्यें मध्यमवर्गातील ब्राह्मण मुलींचें जीवन चित्रण हरिभाऊ आपटे यांनी केलें आहे. या कादंबरीची नायिका यमू हिच्या जीवनाचें चित्रण करतांना हरिभाऊंनीं स्त्री जातीची परवशता दाखविली आहे. यमूच्याच शब्दांत बोलावयाचें तर 'आम्ही स्त्रिया म्हणजे काय मुक्या गाई. जिकडे दावें बांधून नेतील तिकडे आम्ही जावें अशी आमची स्थिति.' अशी स्त्रीजन्मासंबंधींची हरिभाऊंनीं वर्णन केलेली भावना आहे. खेड्यांतील स्त्रिया आजहि हेंच म्हणतात. पण सुशिक्षित स्त्रियांचे बाबतीत ही परीस्थिति राहिलेली नाहीं. त्यांच्यापैकीं बऱ्याच जणी आतां अर्थार्जन करीत असल्यामुळें व त्यांनीं घेतलेल्या उच्च शिक्षणामुळें त्यांच्यांत विलक्षण आत्मविश्वासहि येत चालला आहे. त्यामुळें त्या आपलेंच म्हणणें पुढें करू लागल्या आहेत. आणि तें मानलें गेलें नाहींतर घरापासून दूर रहाण्याचा विचार त्यांच्या मनांत डोकावू लागला आहे ! क्षुल्लक कारणावरूनहि घटस्फोटाची भाषा होते आहे आणि ती मागणी पुरी करून घेण्याबद्दलचा हट्टहि पुढें येतो आहे. समाजधारणेच्या दृष्टीनें ही गोष्ट चांगली नाहीं. परंतु वस्तुस्थिति वरीचशी अशी असल्यामुळें मुली फार शिकूं नयेत असाहि आवाज समाजांत उमटूं लागला आहे. एवढेंच नाहींतर शिकलेली मुलगी संसार करायला नालायक आहे अशा विचारामुळें, मुलगी जास्त शिकली म्हणजे तिचें लग्न करणें हा आईबापांच्यापुढें मोठा अडचणीचा प्रश्न झाला आहे !

दहा माणसांच्या खटल्यांतील एकत्र कुटुंबांत जगणारी हरिभाऊंची यमू आजकाल दिसेनाशी झाली आहे आणि विधवेच्या जीवनाचें त्यांनीं केलेलें हृदयस्पर्शी चित्रणहि आजच्या समाजांत न दिसून येणाऱ्या दृश्यांत जमा झालें आहे. आजची विधवा स्त्री कुंकू लावीत असून केशवपनाची वेडगळ समजूतहि तिनें उरी बाळगलेली नाहीं. उलट फॅशन म्हणून कुमारिका व सवाष्ण स्त्रियाहि कुठें कुठें 'बॉब कट' केलेल्या दिसून येत आहेत.

हरिभाऊंच्या वेळच्या स्त्रीजीवनांतील सुधारणा ह्या आजच्या काळाच्या दृष्टीनें अगदींच हास्यास्पद अशा दिसून येतील. स्त्रियांनीं सभेला जायचे, एखादा निबंध वाचायचा अगर चांदण्या रात्रीं फिरायला जायचें या गोष्टी कुळाचाराला धरून नसल्याची माहिती 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरीत आली आहे ! शंकरमामंजीच्या पत्रांतून "आमची, आमच्या कुळाची, आमच्या घराची जी आपण अब्रू घालविली, ती आतां भरून थोडीच येणार आहे !" आलेले हे उल्लेख आज मोठे चमत्कारिक वाटतात.

सभोंवतालची एकूण परिस्थिति बघून स्त्रियांनीं केवळ शिकून भागणार नाहीं तर एकंदर देशाचीच सर्व प्रकारें सुधारणा झाली पाहिजे व बहुजनांच्या मधील अज्ञानहि गेलें पाहिजे असे विचार हरीभाऊंच्या मनांत घोळत असत. त्यामुळें व्यक्तिगत जीवनापेक्षां सार्वजनिक जीवनास आजन्म वाहून घेणाऱ्या स्त्रीची कल्पना हरिभाऊंनीं 'मी' मध्यें मांडली.

परंतु आजच्या समाजापुढें खरा प्रश्न आहे तो सुशिक्षित स्त्री घरसंसार चांगला कसा करूं शकेल हा आहे. कारण हरिभाऊंच्या अगर त्यांच्या मानस भगिनी काशीताई कानिटकर यांच्या काळामधील सैंपाकघरांतील स्त्री आज राहिलेली नाहीं. अर्थात् या सगळ्या विवेचनामागें कांहीं अपवाद जरूर आहेत. पण ते फार म्हणजे फार थोडे. सर्वसामान्य परिस्थिति आहे ती अशी की, घरकाम अगर मुलेबाळें यांच्या उपसा भरीत स्त्रियांना वाटणारा पूर्वींचा आनंद आतां राहिलेला नाहीं. घरापेक्षां बाहेरच्या जीवनांतील कामकाज स्त्रियांना विशेष आकर्षक वाटूं लागल्यामुळें व घरकामांत गुलामगिरीचा भास वाटत असल्यामुळें त्यांच्या मनीं त्याबद्दल प्रेमच उरलें नाहीं. त्यामुळें सुशिक्षित स्त्रीच्या संसारांत, सुखापेक्षां तिच्या कल्पनेंतून उभारलेल्या दुःखाचे डोंगरच अधिक दिसून येतील !

आजच्या वाङ्मयांत रंगविली जाणारी स्त्री ही फार धीट, नोकरी करणारी, कुणाची पर्वा न करणारी आणि वाटेल त्या विषयाची बेशक चर्चा करणारी अशीच प्रामुख्यानें रंगविली जाते आहे. तिच्याजवळची शालीनता जशी काय पार बुडूनच गेली आहे, एवढें भडक चित्र समाजापुढें येते आहे ! आणि पोषाखाचे बाबतीत बोलावयाचें झालें तर हरिभाऊंच्या वेळच्या स्त्रीनें आतां सातीसमुद्र ओलांडून विमानाचाहि प्रवास केला आहे इतकी ती बदलून गेली आहे !

तथापि एवढें सगळें जमेत धरले तरी देखील हरिभाऊंनी सुरू केलेल्या स्त्री दास्य विमोचनाच्या चळवळीनें त्यांचेच काळांत धरलेलें मूळ आजहि जोरानें फोफावत चाललें आहे. आज दिसणारें स्त्री जीवनाचें स्वरूप हा त्याचाच निष्कर्ष होय. आजची स्त्री ही स्वतंत्र भारताची नागरिक बनली असून पुरुषांप्रमाणें मतदानाचा हक्कहि तिला प्राप्त झालेला आहे. व्यक्ति म्हणून तिचा विकास झाला असून समाजांत ती प्रतिष्ठा मिळवू लागली आहे.

हरिभाऊंनीं आपल्या कादंबरींतील स्त्री ही तिला मिळणारी समाजांतील वागणूक व शिक्षण यावरच भर देऊन रंगविली आहे. आजकालचें समाजकारण व राजकारण त्या स्त्रीच्या जीवनांत त्यांनीं आणलेलें नाहीं. त्यामुळें एका अर्थी त्यांची कादंबरी ही मध्यमवर्गीय स्त्रीजीवनाच्या दृष्टीनें वास्तव राहिली आणि म्हणूनच त्यांच्या कादंबरीचेंहि समाजानें भरपूर स्वागत केलें.

ज्यांच्याबद्दल हरिभाऊंनीं लिहिलें ते विषय आणि तीं माणसें हीं आतां काळाच्या उदरांत गडप झाल्यासारखीं वाटलीं तरी हरिभाऊंचें लेखन हें चिरंजीव आहे. कारण त्यांनीं चित्रित केलेलें स्त्री जीवन हें स्त्रियांच्या स्थायिभावांना स्पर्श करून जाणारें असें आहे. स्त्रियांच्याबद्दल खरी कळकळ वाटणाऱ्या जिव्हाळ्यानें त्यांनीं लेखन केलें. विशाल सहानुभूतीनें स्त्रीजीवनाचा त्यांनीं विचार केला. त्यामुळें त्यांच्या लेखणींतून उतरलेली स्त्री ही सर्वमान्य झाली. ज्या कादंबऱ्यांतून ती अवतरली त कादंबऱ्याहि लोकप्रिय ठरल्या. म्हणून त्यांच्या त्या बाळबोध लेखनाची आजहि समाजाला आवश्य कता वाटते आहे.

आज हरिभाऊ असते तर त्यांनीं आजच्या परिस्थितीशीं समरस झालेली उत्तम कादंबरी लिहिली असती आणि सुगृहिणींचा आदर्श त्यांनीं आजच्या समाजापुढें उभा केला असता. स्त्रीच्या ठायीं आवश्यक असणाऱ्या शालीनता, त्याग, विवेक आणि सेवाभाव या गुणांची उदात्तता त्यांनीं निरनिराळ्या स्वभावलेखांचेद्वारे पटवून दिली असती. आजकालच्या लेखिकांनीं हरिभाऊंचीं ही उणीव भरून काढली तरी पुष्कळसें भागल्यासारखें होईल असें वाटतें. ●●●

अनुक्रमणिका



*कै. हरिभाऊ आपल्या खाजगी जीवनांत एक अविश्रांत व्यासंगी वाचक व ग्रंथसंग्राहक होते हे अभ्यासकांना कदाचित ठाऊक नाहीं. त्याचीच खरी प्रचिति घडविणार हा लेख........*

# पुस्तकपरायण हरि नारायण

—श्री. बा. जोशी

**हरिभाऊं** सारखा युग-प्रतिनिधि साहित्यिक खाजगी जीवनांत एक अविश्रांत व्यासंगी वाचक आणि ग्रंथसंग्राहक होता या महत्त्वाच्या गोष्टीकडे अनेकदां अभ्यासकांचें दुर्लक्ष होतें. त्यांच्या साहित्याच्या कीर्तिमंदिराची उभारणी चतुरस्र व्यासंगाच्या भक्कम पायावर झाली होती.

लहानपणीं महादेव चिमणाजीसारख्या संस्कृत पंडिताच्या आणि अव्वल दर्जाच्या वकिलाच्या देखरेखीखालीं या लाडक्या पुतण्याचें शिक्षण झालें. त्यांना पुस्तकांची गोडी लावली महादेवपंतांनीं. पुढें पूना हायस्कूलमध्यें म. मो., कुंटे, श्री. ग. जिन्सीवाले, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यासारखी मातब्बर मंडळी शिक्षक म्हणून लाभली. नंतर न्यू इंग्लिश स्कूलमध्यें आगरकर, टिळक, नामजोशी, खरेशास्त्री, नंदर्गीकरशास्त्री अशी एकापेक्षां एक दिग्गज मंडळी त्यांच्या विद्याभिरुचीस वळण देऊन गेली. शाळेंत असतांनाच त्यांनीं इंग्रजी, मराठी, संस्कृत ग्रंथांचा मनमुराद आस्वाद घेण्यास सुरवात केली होती. विष्णुशास्त्र्यांच्या अनुकरणानें स्वारीनें रेनॉल्डस्वरहि झेंप घेतली. चुलत्यांनीं नेमलेल्या पंडिताच्या मदतीनें मॅट्रिक होण्याच्या आंतच त्यांनीं अभिजात संस्कृत वाङ्मय वाचून काढलें. प्रि. वामन शिवराम आपट्यांसारखा विचक्षण परीक्षक म्हणूनच त्यांच्या संस्कृत उत्तरपत्रिकेवर प्रसन्न असे. मॅट्रिकआधींच्या दोन–तीन वर्षांत हरिभाऊंच्या चौफेर अवांतर वाचनाची कीर्ति मित्रमंडळींत दुमदुमून राहिली होती. अनेकांना त्यांनींच वाचनाची गोडी लावली. उत्तम ग्रंथ आढळला कीं ते तात्काळ त्याचा डंका पिटीत, मित्रांकडून तो वाचून घेत; त्यावर चर्चा करीत. शालेय पुस्तकांत उतारे असले कीं हरिभाऊ ती मूळ पुस्तकें मिळवून समग्र वाचून काढीत. प्रि. गोपाळ गणेश आगरकरांची मर्जी त्यांच्यावर बसली ती यामुळेंच. 'पांडुरंग हरि' आणि 'तारा' या गाजलेल्या इंग्रजी कादंबऱ्यांचीं भाषांतरें पण त्यांनीं शाळेचा उंबरठा ओलांडण्यापूर्वींच केलीं होतीं !

पुढें डेक्कन कॉलेजांत शिरतांच भगवान् मनूच्या माशासारखीच त्यांच्या मनाची अवस्था झाली ! त्यांच्या वाचनाच्या कक्षा वाढल्या. ग्रंथालय हेंच त्यांचें वसतिगृह बनलें." हरिभाऊ सांपडत नसले तर ग्रंथालयांत शोधा, हटकून सांपडतील" असा प्रवाद रूढ झाला. तासंतास त्यांनीं तन्मयतेनें ग्रंथाच्या सहवासांत घालवले. त्यांच्या समकालिन मित्रांची पण अशीच साक्ष आहे कीं, "कॉलेजच्या आयुष्यक्रमांत हरिभाऊंनीं आपल्या अनेक सहाध्यायांचें प्रेम संपादन केलें....' (पण) कोणाच्या सानिध्यांत देहाचा विसर पडून त्यांची वृत्ति तन्मय होत असेल तर ती ग्रंथांच्या सहवासांतच होय. कॉलिजच्या वर्षांत याच मित्रांची ओळख करून त्यांचा स्नेह जोडण्यांत त्यांनीं आपला वेळ खर्च केला !' स्वतः वाचून ते स्वस्थ कधींच बसत नसत. बरोबरच्यांना ते तात्काळ आपणासारखे करीत' प्रि. सेल्बींनीं स्वतःचा ग्रंथसंग्रह देऊन विद्यार्थ्यांसाठीं वाचनालय काढले त्याचे पहिले चिटणीस हरिभाऊच होते. डॉ. भांडारकर प्रो. वै. का. राजवाडे यांच्याशीं भांडून त्यांनीं त्यासाठीं मराठी पुस्तकें घेतलीं.

स्वतः त्यांनीं मेकॉले, बेकन, बर्क, जॉन्सन प्रभृति विदग्ध इंग्रजी ग्रंथकार पचविले एवढेंच नव्हे नव्या नामांकितांचीं नांवें वाचनांत येतांच त्यांचें साहित्य हुडकून काढून वाचलें. न मिळालें तर तें मिळविण्यासाठीं आटापिटा केला. शेक्सपिअरचा तास असो संस्कृतचा असो वा एथिक्सचा असो, शिकवणाऱ्या प्राध्यापकांना या व्युत्पन्न शिष्याशीं अर्थाच्या वा निरूपणाच्या सरसतेबद्दल वाद घालण्यांत धन्यता वाटू लागली. प्रो. वासुदेवराव केळकर आपलें लेख प्रसिद्धिपूर्वी या विद्यार्थ्यास वाचून दाखवीत. मात्र याप्रमाणें साहित्यांत अहोरात्र अवगाहन करणाऱ्या या विद्यार्थ्याचा 'गणित विषयांतील अगणित अडचणींनीं' पिच्छा पुरवला. कॉलेज बदलून पाहिलें तरी गणिताचा पेपर कांहीं सोपा ठरला नाहीं ! दोन वेळां ते प्रिव्हिअस नापास झाले.

"मुलाच्या हातांत पहावें तेव्हां पुस्तक असतें तरी मुलगा नापास होतो कसा" याचें घरांतील मंडळींना आश्चर्य वाटे. चुलत्यांना त्यांच्या ग्रंथभक्तीचा अंदाज होता. पण कसेंहि करून हरीनें पदवी घ्यावी व विलायतेस जावें असा त्यांचा आग्रह होता. हरिभाऊ पण मोठी उमेद धरून अभ्यासाला बसत. पण पुस्तकांचें व्यसन कोणत्याहि अंमली पदार्थाइतकेंच जालीम असतें ! सौ. काशीताई कानिटकरांना त्यांनीं एका पत्रांत लिहिलें, "या परीक्षांनीं तर मोठाच त्रास दिला आहे. कांहींहि इतर वाचावयास जा;

त्यावेळीं अर्पण हें वाचण्यापेक्षां आपल्या अभ्यासाचें पुस्तक वाचल्यास बरें असें वाटून तें हातीं घेतलेलें पुस्तक निमूटपणें एकीकडे ठेवावें लागतें."

नाईलाजानें हरिभाऊंनीं कॉलेजजीवनास रामराम ठोकला. चुलते अण्णासाहेब आपटे हे कर्तबगार वकील होते. हरिभाऊंनीं निदान व्यवसाय करावा असें त्यांना वाटलें. प्रकाशन व्यवसायांत पुस्तकांशीं संबंध येत राहील या हेतूनें हरिभाऊंनीं जगदीश्वर छापखान्यांत सहा महिने उमेदवारी केली. पण मन रमेना. म्हणून ते 'कुळकर्णी आणि मंडळींत शिरले. त्यांतूनच १८९० मध्यें 'करमणूक' पत्राचा जन्म झाला. पण अण्णासाहेबांना हरिभाऊंच्या जिवाची ही घालमेल पाहवेना. त्यांनीं एक योजना आंखून स्वतःच्या संस्कृत विद्याभिरुचीची हरिभाऊंच्या साहित्यानुरागाशीं गांठ घालून दिली. २॥ लक्ष रुपयांच्या 'आनंदाश्रम' निधि स्थापन करून हरिभाऊंवर व्यवस्थापकाची कामगिरी सोंपवली. पुढील तीस वर्षें हरिभाऊंनीं अण्णासाहेबांनीं व्यवस्थित आंखलेल्या त्या चाकोरींत आनंदानें व्यतीत केली. याच आनंदाश्रमानें संस्कृत ग्रंथाचें जतन केलें, प्रकाशन केलें, याच आनंदाश्रमांत हरिभाऊंनीं मित्रमंडळीसह काव्यशास्त्रविनोदाच्या असंख्य बैठकी रंगवल्या, याच आनंदाश्रमांत हरिभाऊंनीं स्वतःच्या कष्टार्जित पैशांतून हजारों ग्रंथ विकत घेऊन वाचले!

स्वतःची कमाई मिळूं लागल्यापासून हरिभाऊंनीं ग्रंथ विकत घेऊन त्यांचा संग्रह करण्यास सुरुवात केली. आनंदाश्रम संस्थेचाहि स्वतंत्र संग्रह त्यांनीं कसोशीनें वाढवला. त्यांचा स्वतःचा ग्रथसंभार त्या इमारतीच्या शेवटच्या मजल्यावर असे. शेवटीं सुमारें १२००० पुस्तकें त्यांत होती! हरिभाऊ नवें पुस्तक हाताळीत असतांना त्यांच्या चेहेऱ्यावर ओसंडणाऱ्या आनंदाचें प्रसन्न दर्शन त्यांच्या अनेक निकटवर्तीयांना विलोभनीय वाटलें आहे. ज्या वेळीं एखाद्या विषयाचा ते पाठपुरावा करीत असत त्या वेळीं अल्पावधींतच त्यांच्या ग्रंथालयांत त्या विषयाचा वेगळा विभाग करण्याइतकी पुस्तकें जमा होत. छायाचित्रण, बागकाम, शेक्सपिअर अशांसारखे विभाग तर एवढे संपन्न होते कीं पुण्यांतील त्या विषयांवरील 'एकमेवाद्वितीयम्' संदर्भस्थानाचा दर्जा आनंदाश्रमास आला होता. विलायतेंहून येणाऱ्या प्रत्येक जहाजावर "ह. ना. आपटे, आनंदाश्रम, पूना, इंडिया" या पत्त्याचें एक तरी पुस्तकपार्सल असायचेंच! मुंबई, कलकत्ता, मद्रास, येथील बड्या पुस्तक विक्रेत्यांशीं एखाद्या ग्रंथालयाच्या इतमामानें त्यांचा स्वतःचा पत्रव्यवहार होई. अण्णासाहेबांनीं त्यांना लिहिलेल्या एका पत्रांत म्हटलें होतें "मला पुत्र नाहीं. तथापि माझ्या आप्तीयांत तुजसारखा मुलगा झाला म्हणून धन्यता वाटते. तूं मागितलीस तीं पुस्तकें मुंबईंत मिळत नाहींत. तथापि ती भूपृष्ठावर कोठेंहि असोत, प्रयत्नसाध्य असलीं पाहिजेत, म्हणजे मी तुला मिळवून दिल्याखेरीज राहणार नाहीं खास"!

पुस्तकें वाचून विसरण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. ते आनंदासाठीं वाचीत. त्यामुळें शेक्सपिअर, मिल्टन, शेली ते वारंवार वाचीत. ना. गोखल्यांच्या संगतीनें त्यांना ब्राउनिंगची गोडी लागली. टेनिसन, वर्डस्वर्थ, लाँगफेलो हे आणखी कांहीं प्रियकवि. यांच्या साहित्याचे ४-४, ५-५ सेट त्यांच्या संग्रहीं होते. कधीं सुंदर चित्रांच्या नादानें, कधीं सुबक छपाईसाठीं, कधीं संपादनकौशल्याच्या लोभानें ते वेगवेगळ्या आवृत्त्या घेत. कै. आजगांवकर हे अनेक वर्षें हरिभाऊंचे 'ग्रंथपाल' होते. त्यांच्या आठवणी प्रमाणें हरिभाऊंच्या संग्रहांत फ्रेंच मापेंतील उत्तान शृंगारात्मक सचित्र कादंबऱ्यांचाहि भरणा होता

एकदां वर्डस्वर्थची नवी आवृत्ति पांच खंडांत विक्रीस आली. रेंदाळकर कवींनीं त्यांना प्रश्न टाकला, "आधीं इतक्या प्रति असतां आणखी कशाला?" त्यांनीं प्रतिप्रश्न केला," तुम्हीं आपल्या मुलींना नवीन लोंकरी झबलीं कशाला शिवतां? साऱ्या कपड्यांनीं काय शरीररक्षण होत नाहीं? माझें या पुस्तकांवर मुलांसारखेंच प्रेम आहे. निरनिराळ्या वेषांत त्यांना नटलेलें पाहण्याचा आनंद कांहीं निराळाच आहे!" खरोखरच ते ग्रंथावर अजब माया करीत असत. एकदां एका नव्या पुस्तकांची पानें सुटीं करीत बसले असतां त्यांच्या एका मित्रकन्येनें विचारलें," तात्या, पुस्तक फाडण्याची एवढी घाई कां करतां?" ते म्हणाले," नवें लुगडें आणलें कीं, त्याची घडी केव्हां उलगडीन असें जसें तुला होतें तसेंच नवें पुस्तक उघडून केव्हां पाहीन असें मला होतें" हरिभाऊंची ही लायब्ररी सतत उपयोगामुळें सदा अव्यवस्थित अवस्थेंत असे. चार दिवसांपूर्वी विकत घेतलेलें पुस्तक कुठें गळपटलें याचा पत्ता न लागून जरूर

पडली म्हणून पुन: त्याची प्रत आणली जाई ! एकदां तर आजगांवकरांनीं आपल्या परिश्रमांचा मोबदला पैशांत न घेतां 'जादा प्रति ' निघतील त्या पुस्तकांच्या रूपानें घेण्याची अट हरिभाऊंकडून कबूल करून घेतली. आणि अशा प्रतींची रास एवढी मोठी निघाली कीं हरिभाऊंसुद्धां थक्क झाले !

हरिभाऊ एका वेळीं एकच पुस्तक वाचीत असत. त्यांत खुणा करून खुबीदार आणि खुमासदार भागांचें मोठें प्रत्ययकारी वाचनहि ते मित्रांपुढें करीत. "केव्हांहि पाहावें ह. म. प. च्या हातांतील जपमाळेप्रमाणें हरिभाऊंच्या हातांत पुस्तक असावयाचेंच " आणि मग समोरील व्यक्तिच्या पात्रापात्रतेचा विसर पडून ते प्रकटपणें रसास्वादन करूं लागत. कित्येक वेळां मग समोरचा माणूस चुळबूळ करूं लागे, ऑफिसच्या वेळेची सबब सांगे. " या लोकांना साहित्यसेवेपेक्षां साहेबसेवेचीच ओढ फार !" असा वैतागोद्गार मग हरिभाऊंच्या तोंडांतून येई. कांहीं मंडळी तोंडदेखलेपणें त्या पुस्तकाची इतकी प्रशंसा करीत कीं हरिभाऊ आग्रहानें पुस्तक त्यांना वाचण्यासाठीं देत. पण ही मख्ख मंडळीं पुस्तकाचें पानहि न उलटतां कधींतरी ते परत करीत. हरिभाऊ म्हणत, "पाहिलंत कां हें पुस्तक '? हें उत्तम आहे असा अभिप्राय दिला. पण त्यांचें पुस्तकावरील प्रेम इतकें कीं त्याची पानें फाडण्याइतकेंसुद्धां त्याला दुखावलें नाहीं ! याला म्हणतात पुस्तकप्रेम !"

असें महाभाग क्वचित् भेटत असले तरी समानधर्मीयांचा सतत सहवास त्यांना लाभे. रसिक गुणज्ञ स्नेहीं मंडळींच्या सहवासांत घालवलेले अनमोल सुखाचे क्षण त्यांच्या आयुष्यांतील एक ठेवाच होता. नाना खाद्यपदार्थांच्या आस्वादानें या बैठकी अधिक लज्जतदार होत. त्यांचे एक मित्र विनोदानें म्हणत, "पुस्तकें आणि मिठाई या दोन बंद्यास तुम्हीं नालायक आहांत. कारण एखादा पदार्थ रुचकर झाला किंवा एखादा ग्रंथ वाचनीय झाला, कीं लोक विकत घेतील याची वाट न बघतां तुम्हीं तो वाटूं लागाल ! "

हरिभाऊंनीं ना. गोखल्यांना पुस्तकें दिलीं, तशींच लो. टिळकांना पण दिलीं. पुस्तकांविषयीं कोणी उत्सुकता दाखविली आणि हरिभाऊंनीं त्यांची हौस पुरविली नाहीं असें कधीं झालें नाहीं. लोकमान्यांना हवीं असलेलीं कांहीं पुस्तकें पुण्यांत मिळेनात, हरिभाऊंकडेहि तीं नव्हतीं. पण हात चोळीत स्वस्थ न बसतां हरिभाऊंनीं स्वत: व्यवस्था करून तीं मुंबईच्या एशियाटिक सोसायटींतून आणवून टिळकांना पोंचती केलीं !

रात्रीं भोजनोत्तरहि ते वाचीत. पुढें निद्रानाशाचा विकार जडला तर जणूं त्यावर सूड म्हणून ते रात्रभर वाचीत बसत ? रात्रीं-अपरात्रीं आठवण झालीं कीं तिसऱ्या मजल्यावर जात, हवें तें पुस्तक शोधून घेत आणि आठवणीनें डिवचलेला भाग रसिकतेनें वाचून पुन: झोंपत. १९१८ मध्यें 'पापणीचा पॅरालिझीस' झाला तेव्हां पुस्तकें वाचवून घेऊं लागले, पण वाचनास पूर्णविराम केला नाहीं.

जलोदरानें अंथरूण धरावें लागलें तरीहि त्यांची पुस्तकमैत्री कायम होती. उलट विझण्यापूर्वी ज्योत मोठी व्हावी त्याप्रमाणें अधिक जोरानें ते वाचूं लागले. रोज नवनवीन पुस्तकें मागवूं लागले. आलेल्या गठ्ठयांची उस्तवारी करतांना त्यांना व्याधीचा विसर पडे. जुने आणि आवडते ग्रंथकार त्यांच्या उशापायथ्याशीं लोळूं लागले. 'पुस्तक पोटावर ठेवून वाचतांना त्रास तर होत नाहीं ना ?" असें कोणी विचारल्यास "छे, मुळीच नाहीं ! पोटाचें आयतेंच टेबल झालें आहे " असें ते उत्तर देत.

शेवटीं शेवटीं त्यांना पुस्तकें पाहण्यावरच समाधान मानावें लागलें. या दृष्टिभेटीनेंहि त्यांना विरंगुळा लाभे. " नुसतें पुस्तकांकडे पहात बसण्यांत काय मौज वाटते ?" असें विचारतां ते उत्तरले, "मला हे जे शेंकडो व्यवहारी लोक भेटावयास येतात, त्यांच्यामुळें जो त्रास होतो, तो या माझ्या आप्तांकडे पाहून पार नष्ट होतो. माझे हे अत्यंत जिवलग स्नेही आहेत आणि यांचा नुसता सहवासहि मला फार सुखाचा वाटतो. "

३ मार्च १९१९ रोजीं सीतारामपंत केळकर कांहीं पुस्तकें घेऊन आनंदाश्रमांत गेले होते. हरिभाऊंच्या आसन्नमरण अवस्थेची त्यांना जाणीव नव्हती. पण हरिभाऊंनीं अंतिम घडी समीप आल्याचें ओळखलें होतें. त्यांनीं सीतारामपंतांना जवळ येण्यास खुणावलें," ती समोरच्या कपाटांतील सारीं पुस्तकें आणून मजजवळ दे. कांहीं माझें अंगावर पसर. माझें सारें आयुष्य ग्रंथांतच गेलें. मला ग्रंथांतच मरण येऊं दे "

एका श्रेष्ठ ग्रंथभक्ताचें निर्वाणीचें उद्गार यापर तें दुसरें काय असणार !




# म. सा. संमेलनाध्यक्ष 'कुसुमाग्रज'

गोमंतकांत भरणाऱ्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या-अध्यक्षपदीं-अतिशय शांत, धकाधकीच्या आणि बुरसटलेल्या समाजकारणापासून अलिप्त आणि एकंदर वाङ्मयीन ढोंगवत्तुऱ्यांपासून सदा दूर राहाणाऱ्या कविवर्य श्री. विष्णु वामन शिरवाडकर उर्फ 'कुसुमाग्रज यांची निवड झाल्याबद्दल आम्हीं त्यांचें अभिनंदन करतों. दीपावलीचा आणि कुसुमाग्रजांचा संबंध ऋणानुबंधासारखा; किंबहुना दीपावलीच्या प्रगटना पूर्वीचा. आमच्या अभिनंदन पत्राला उत्तर पाठवितांना त्यांनी त्या पूर्वीच्या आनंददायक भेटींचा आवर्जून उल्लेख केला. कीर्ति वैभवाच्या शिखरावर बसल्यानंतर पूर्वस्मृतींना उजाळा देणारीं आणि त्यांत आनंद मानणारीं माणसें आज घडीला फार दुर्मिळ झालेलीं आहेत. वास्तविक कुसुमाग्रज हे अत्यंत प्रतिभावान व समर्थ अशा कांहीं मराठी कवींपैकीं एक असले तरी स्वत:च्या अशा वेगळ्या वाङ्मयीन वैशिष्ट्यांनी स्वत:भोंवतीं निर्माण केलेल्या तेजस्वी वलयानें इतरांहून आगळें व्यक्तिमत्व लाभलेले कलावंत आहेत. पहिल्या दर्जाचे नाटककार, पहिल्या दर्जाचे कादंबरीकार, त्याच दर्जाचे कथाकार आणि तत्वचिंतनात्मक नादमधुर गद्य लिहिणारे शैलीकार म्हणूनहि त्यांचा लौकिक आहे.

### विविध भूमिका

त्यांच्या एकंदर लिखाणांतून जसें मराठी भाषेचें वैभव ओसंडतें तसेंच निष्कलंक अशा मानवी मूल्यांचें प्रतिबिंबहि त्यांत ठायीं ठायीं दिसतें. अमुक तऱ्हेच्या वाङ्मयाला आज भाव आहे- तेव्हां घ्या त्यांत हात धुवून आणि फिरवा टोपी अशी त्यांची वृत्ति नाहीं. ज्यांच्याकडे आजच्या तरुण पिढीनें आशेनें



**महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष कविवर्य 'कुसुमाग्रज'**

पाहावें आणि वाट विचारावी, असे विचारवंत साहित्यसेवक आज फार थोडे आहेत. कुसुमाग्रज हे त्यांच्यापैकीं एक. त्यांनी विविध तऱ्हेचें साहित्यिक जीवन पाहिलेलें आहे. उमेदवार, सहसंपादक, संपादक अशा तीनहि भूमिका नियत कालिकांच्या संसारांत त्यांनी वठविल्या. आणि इतकेंहि करून ते अजातशत्रु राहिले. कुसुमाग्रजांच्या साहित्यसेवेबद्दल कितीहि लिहिलें तरी तें अपुरेंच वाटावें, इतकी त्यांची साहित्यसेवा अमोलिक आहे; व अलौकिक आहे. कुणाचा द्वेष नाहीं, मत्सर नाहीं, कोणत्याहि गटवाजींत नाहीं. असा हा सज्जन साहित्यिक मडगांवीं भरणाऱ्या साहित्यसमारोहाला अध्यक्ष म्हणून लाभला हें गोमंतकाचें भाग्य आहे. त्यांच्या या सन्मानाबद्दल आम्हीं त्यांचें मनापासून अभिनंदन करतों आणि अंगिकृत कार्यांत त्यांना सुयश चिंतितों. ●●●

# श्री. काशीनाथ दामोदर नायक

महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्षपदीं मडगांव येथीलव्यवसायानें व्यापारी पण वृत्तीनें व्यासंगी वाङ्मयसेवक असे श्री. काशीनाथ दामोदर नायक बहुमतानें निवडून आले याबद्दल त्यांचे आणि त्यांना निवडून देणाऱ्यांचेंहि अभिनंदन करतों. कारण या पदाला काशीनाथ नायकांइतका अभिजात वाङ्मयाचें परिशीलन केलेली, आणि एकंदर मराठी वाङ्मयाबद्दल आस्था व जाण असलेली किंबहुना सांस्कृतिक इतिहासाच्या कित्येक खुणा ज्ञात असलेली दुसरी व्यक्ति गोमंतकांत शोधूनहि सांपडली नसती.

### मौलिक लेखन

दीपावली वार्षिकाच्या पहिल्या अंकापासून त्यांची अनेक तऱ्हेनें मदत झालेली आहे. त्यांचे कित्येक संशोधित असे, गोमंतकाची सांस्कृतिक परंपरा सांगणारे मुद्देसुद लेख दीपावलींतून प्रसिद्ध झालेले आहेत. विद्वज्जनांनी त्या लेखांची स्तुतीहि केलेली आहे. मठग्रामांतील अनेक सार्वजनिक कार्यांत त्यांची सक्रिय मदत असतेच. गोमंतकांत उदय पावलेल्या बऱ्याच सार्वजनिक संस्थांना त्यांचें मार्गदर्शन लाभलेलें आहे व लाभतहि आहे. व्यापार, भाषा, देवदेवताचेंनें, आयात-निर्यात, वाङ्मयीन वाद इत्यादि विषयांवर त्यांनी थोडेंच पण बरेंच मौलिक लिखाण केलेलें आहे. साहित्य आणि साहित्यकार या दोघांविषयीं अतिशय जिव्हाळा असलेलो अशी एक निगर्वी वृत्तीची व्यक्ति महाराष्ट्रांतून जाणाऱ्या मोठमोठ्या सारस्वतांच्या स्वागतासाठीं आज सिद्ध झालेली आहे. ही जबाबदारी ते आनंदानें पार पाडतील अशी आशा व्यक्त करतो.

**लक्षवेध**

'ऐसी अक्षरें रसिकें मेळवीन' हे पुस्तक परीक्षणाचे सदर जागे अभावी देता आले नाही. पुढील अंकात ते देण्यांत येईल.








# असामान्य 'असा मी'

'असा मी असा मी'-चा बहुरूपी खेळ बघायला जातांना मन वरेंच साशंक होतें. वटाटचाच्या चाळीनें नव्या रंगांत बुडवून टाकून मंत्रमुग्ध केलें होतें. 'न भूतो न भविष्यति' असा मनानें मंत्रहि घोकून टाकला होता. त्या नंतरची 'वाऱ्यावरची वरात' दोन घटका करमणुक करून गेली; पण वटाटचाच्या चाळीची धुंदी ती उतरवूं शकली नाहीं. त्या चाळीची बांधणीच अशी मजबूत झाली, कीं सर्व नवीं जुनीं रचनाशास्त्रें तिच्या अंवतींभंवतीं घुटमळूं लागलीं. नाना नातीं सांगूं लागलीं. तिच्या उभ्या राहण्याच्या ठसक्यानें मन चाळवलें होते. तिच्या दर्शनाने एकदां बांधलेली लय उतरत नव्हती.

### पडदा उघडतो तेव्हां

त्यामुळेंच 'असा मी' पाहायच्या आधीं मन एका अनामिक भीतीनें संशयीत होतें. 'चाळी' पेक्षां 'असामी' कमी पडेल का ? फिका पडेल का ? '. छे छे, चाळीची सर नाहीं !' हें नवाक्षरी वाक्य उच्चारावें लागेलच का ? या शंकांनीं पाटकर सभागृहांत पाऊल ठेवलें. तृप्त मनाच्या स्त्री-पुरुषांनी सभागृह गच्च भरलेलें होतें. त्यांतील प्रत्येकाबद्दल आपल्या कुटुंबाला कमींत कमी दोन मिनिटें तरी माहिती सांगावी इतके ते कर्तबगार होते. जाहीर केलेल्या ठोक्यालाच बरोबर दिवे गेले आणि देवी शारदेचें स्तवन सुस्वर आवाजांत सुरु झालें. 'याकुन्देन्दु तुषार हार धवला' समागृहांतलें सारें वातावरण त्या स्तवनानें शांत शांत झालें. 'सा मां पातु सरस्वति' या चरणाचा उच्चार चार पांच वेळां झाला. रोम रोम पुलकित झाले. नारीच्या आवाजानें थोडीशी प्रस्तावना केली. पडदा उघडला गेला आणि रंगभूमीच्या डाव्या अंगाला एका मंदशा प्रकाशझोता खालीं कोट टोपी घातलेली एक जाडगेलीशी मूर्ति प्रेक्षकांकडे पाठ करून कांहींतरी लिहीत बसलेली दिसली.

### नाट्य सृष्टींतला चमत्कार

हीच ती असामी. "कुणीसं म्हटलंय– कसा मी ? कसा मी ? कसा मी ? कसा मी ? जसा मी तसा मी असा मी असा मी !" अशा लयबद्ध वाक्यानें त्यानें सुरवात केली. आणि एक एक मोत्याच्या मोलाचा शब्द माला गुंफूं लागला. वाक्या वाक्यागणीक प्रेक्षागारांतून हास्याचे लोटच्या लोट उठत होते. सगळें सभागार हास्यानें भरून गेलें होतें. शिष्ट माणसांची तर हंशा कोंडून ठेवल्यामुळें पोटें फुटायची वेळ आली. इतरांबरोबर त्यांनीहि मोकळया मनानें तो सोडून दिला. पहिले जवळ जवळ पावणे दोन तास कसे संपले तें कळलें देखील नाहीं. नाट्यसृष्टींतला अलीकडच्या काळांत एकाच माणसानें घडविलेला हा दुसरा चमत्कार आहे यावर विश्वास वसूं लागला.

मध्यंतरानंतर पुन्हां दुसरा टप्पा सुरु झाला. एकाच माणसाचा हा जीवनप्रवाह. ओघाओघानें त्यांत दुसरी माणसें वहात आलेलीं; पण एकच माणूस साडेतीन तास आपली कथा सांगूं लागला तर ऐकणाऱ्याला तें कसें सहन होईल ? आणि सध्याच्या अतिवेगानें धावणाऱ्या युगांत तेवढें सहन करायची ताकद आहे कुणाला ? पण असा मीला ती जाण आहे. त्यानें दोन्हीं बाजूंचा पूर्ण विचार केलेला आहे. तो सादरकर्ताहि आणि त्याचबरोबर प्रेक्षकहि आहे. जसा तो असामींतल्या अनेक भमिका एकदम वठवितो तसाच एकाचबरोबर सादरकर्ता आणि प्रेक्षक यांचीहि भमिका वठवितो. कथेंत येणाऱ्या उपकथानकांना त्यानें अतिशय मोहक सजावट केलेली आहे. त्या उपकथानकांतील पात्रांचा देहस्वभाव अतिशयोक्तीनें त्यानें मांडलेला नाहीं. प्रत्येक गोष्टींत मर्यादा ठेवलेली आहे. त्यामुळें कंटाळयाला समागृहांत शिरायला जागाच मिळत नाहीं.

### आत्मकथेची धार

मानवी जीवनाचे सूक्ष्मतिसूक्ष्म पापुद्रे इथें सोलले जातात आणि ढोंगाच्या बुरखा इथे हंसत हंसत फाडला जातो. असें करतांना व्यक्तिव्यक्तींतील खरेखोटेपणाचें विदारक दर्शन इथें घडतें. शहरवासियांना तेंच हवें असतें. त्यांच्या मार्गावर बोट ठेवलें जातें; पण तें हंसत हंसत सहज विनोदानें जरादेखील ओरखडा न काढतां. बहरूप्यांच्या या खेळांत नाना तऱ्हेचीं माणसें येऊन जातात. शेजारी पाजारी, ऑफिसमधल्या मालकांपासून चपराशापर्यंतचे सर्व लोक, शिपी, धोबी, दाणेवाला, कापडवाला, नाटककार, मास्तरीण, शेठजी असे एक ना दोन इसमांनी डझनानीं येतात; पण नकोसे वाटत नाहीं. असामीच्या आत्मकथेला त्यामुळें धार चढत राहाते.

### नाद मधुर शैलीचे झंकार

पूर्वीच्या नाटकांत पांच पांच मिनिटांची स्वगत भाषणें असत; पण तीं असह्य होऊं नयेत म्हणून संगीतापासून अनेक विविध रंग त्यांत पेटलेले असत; पण साडेतीन तास असें श्रवणसुभग गद्य ऐकलें नव्हतें. वटाटचाची चाळ नाना ढगांनीं नटली होती. नाटकी अंग त्यांत वरेंच प्रतीत होत होतें पण असामींत असलें नाटकी अंग नाहीं. असामींत पु. लं. देशपांडेचांच्या नादमधुर शैलीचे झंकार आहेत. त्या भाषेच्या नादाचीं आवर्तनावर आवर्तनें फुलंतला असामी घेत राहतो आणि साडेतीन तास प्रेक्षकाला खुर्चीत ठोकून ठेवतो. खरोखर सुंदर, अप्रतिम ! वटाटचाच्या चाळीइतकाच किंबहुना कांकणभर जास्तच सरस आहे हा असामान्य असामी ! दीपावलींत ही लेखमाला प्रसिद्ध झाली होती. हा आम्हांला अभिमान ! ●●●

# दोन तपस्वि कलावंतांचा अस्त

**गेल्या** महिन्यांत दोन थोर महाराष्ट्रीय कलावंतांचा अस्त झाला. या दोन्हीं कलावंतांनीं आपल्या कलागुणांनी हिंदुस्थानांतील असंख्य स्त्री-पुरुषांना रिझविलें आणि मानवी जन्माला येऊन आयुष्याचें सार्थक केलें. हे दोन थोर कलावंत म्हणज एक सुप्रसिद्ध कलादिग्दर्शक चित्रकार शेख फत्तेलाल आणि दुसऱ्या गानाभिनय संपन्न श्रीमति शांता आपटे.

फत्तेलालनीं आपल्या आयुष्यांत अनेक चढउतार पाहिले. ज्या प्रभात फिल्म कंपनीचें नांव देशीं विदेशीं दुमदुमलें, एक प्रचंड परंपरा जिनें निर्माण केली त्या प्रभातच्या संस्थापकांपैकीं फत्तेलाल हे एक प्रभात








हें एक संस्थान होतें. एक विद्यापीठ होतें. ललित कलांच्या मनोज्ञ विलासाचें आगर होतें. त्या संस्थेला वैभवाच्या शिखरावर नेऊन वसवायला फत्तेलालनींहि अविश्रांत श्रम केले होते. अंतर्गत कलहानें पेट घेतला आणि फत्तेलालजींच्या डोळ्यादेखत प्रभातच्या अग्रभागीं फडफडणारा किर्तीध्वज खालीं आला. आणि एका दिवशीं तें सारें वैभवहि दृष्टिआड झालें. एका कर्तबगार माणसाला-आयुष्यवेचून वाढविलेला वृक्ष डोळयादेखत उन्मळून पडतांना पाहावा लागला; परंतु हाडाचे चित्रकार असलेल्या फत्तेलालजींनीं तें दुःख हृदयाच्या एका कप्यांत ठेवून अभिजात अशा निसर्गचित्रणांत आयुष्याच्या अखेरीपर्यंत ते रंगून गेले.

### एक आठवण

१९४६ च्या सुमारास मी त्यांना निसर्ग-चित्र रंगवितांना पाहिलें होतें. प्रभातमध्यें तत्कालांत इतरहि संस्थांची चित्रणें चालू असत. अशाच एका संस्थेंत मीहि काम करीत होतों. चित्रकलेचीं अपरंपार आवड असल्यानें फत्तेलालजी एक निसर्ग-चित्र रंगवित असतांना अजाणतेपणें मी त्यांच्या पाठीमागे उभा राहिलों. विविध रंग एकांत एक मिसळत होते. व निसर्गाचें एक निरागस रूप आकार धारण करीत होतें. हिरवा, पिवळा, निळा, जांभळा, लाल, किरमीजी, जलरंगत उमें केलेलें तें हृदयंगम चित्र संपवितांच माझ्या तोंडून नकळत उद्‌गार निघाला-वा!

चष्म्याच्या जाडशा भिंगांतून दृष्टि वळली; एक करडा प्रश्न आला "कोण आपण?" प्रभात फिल्म कंपनीच्या मालकांना काय उत्तर द्यावें कळेना; पण कै. शिवराम वाशीकर त्याचवेळीं तियें आले. त्यांच्या संभाषणांत त्यांनी माझी तारफेची तरफ लावून ओळखहि करून दिली. वाशीकरांच्या वशील्यानें त्यांच्या कचेरींतील अनेक निसर्ग-चित्रें मला पाहातां आलीं, कंपनींतील लोक फत्तेलालजींना 'साहेबमामा' म्हणत असत. ओळखीनंतर एकदां पुढचें पाऊल टाकलें– कंपनींतील कोणत्याहि खात्यांत शिरायची त्यांनीं मोठया आनंदानें दिली. त्यांच्या कचेरींतील टेबलावरील कांचेखालीं दर आठवडयाला अनेक नवीं निसर्ग-चित्रें पाहायला मिळत असत. साहेबमामा गेले. पंचमहाभूतांना रंगांत साकारूं इच्छिणारा त्यांचा आत्मा त्यांतच विलीन झाला! कोल्हापूरच्या एका थोरपरंपरेतील आणखी एक खांब कोसळला.

### रंगभूमीचें नुकसान

रजतपट आणि रंगभूमी या दोन्हीं कला सृष्टीत सारख्याच तेजानें शांता आपटे तळपल्या. आजच्यासारख्या संख्येनें बेसुमार वायका चित्रपट सृष्टींत शिरल्या नव्हत्या त्यावेळी शांताबाई 'प्रभात' सारख्या एका श्रेष्ठ संस्थेत प्रमुख भूमिकेंत वावरल्या. त्यांचे अनेक चित्रपट वर्ष वर्ष चालले. अमरज्योति, अमृतमंथन, गोपालकृष्ण, कुंकू अशा एकाहून एक सरस बोलपटांत शांताबाईंनी सुरेख भूमिका केल्या. चित्ररसिकांच्या स्मरणांत त्यांच्या भूमिका कायमच्या राहिलेल्या आहेत.

रंगभूमीवरचें त्यांचें पदार्पणहि यशदायी झालें. मानापमान, स्वयंवर, सौभद्र आदि सर्व वजनदार नाटकांतल्या त्यांच्या मुख्य स्त्रीभूमिका गाजल्या, लोकप्रिय झाल्या, टप्पा अंगाच्या गाण्याची तालीम त्यांनीं कित्येक वर्षे घेतली होती. त्यांच्या गाण्याच्या बैठकीहि रंगत असत. भजनेंहि त्या सुरेख गायच्या. या सर्व कलासृष्टींत शिथीलपणानें न वागतां आपल्या मर्यादित वृत्तीनें त्यांनीं सर्व ठिकाणी आब ठेवला होता. अशी ही गुणी अभिनेत्री फेब्रुवारीच्या २६ तारखेला हें जग सोडून गेली. ती अकाली गेलीं असेंच म्हटलें पाहिजे. प्रत्येक गोष्ट जीव ओतून करणें. हा त्यांचा स्वभाव होता. रंगभूमीवरच्या आपल्या भूमिका त्यांनीं जुनी परंपरा राखूनहि स्वतःच्या विचारांची

## 'ललित' चे स्वागत

मुंबईचे एक वडाडीचे होशी व प्रयोगशील प्रकाशक श्री. केशव कोठावळे ह्यांच्या संपादनत्वाखालीं गेल्या फेब्रुवारी महिन्यापासून 'ललित' नांवाचे मासिक सुरु झाले आहे. गेल्या कांहीं वर्षांत मराठी नियतकालिकांच्या जगतांत अनेक 'पावसाळी छत्र्या' उगवल्या व महर्गतेच्या, वाचकांच्या उपेक्षेच्या आणि लेखकांच्या दुर्भिक्षाच्या ग्रीष्मामुळें त्यांचा यथाकाल लोप झाला.

'ललित' मासिकाने सुरुवातीपासूनच आपली भूमिका नम्र व सर्वोदयी स्वरूपाची ठेवल्यामुळें त्याच्या अस्तित्वानें कुणाला बाध येणार नाहींच उलट ग्रंथव्यवहाराच्या सर्वांगीण प्रगतीस त्याचा विशेष हातभार लागणार आहे. पहिल्या अंकाची रचना व सदरें पाहातां प्रस्तुत मासिक हें ग्रंथालयांना प्रकाशकांना, लेखकांना जसे उपयुक्त ठरेल तसेच वाचकांनाही मराठी साहित्याची यथार्थ व निपक्षपाती ओळख करून देऊन वाचनाची आवड वाढवण्यांत सहाय्यक ठरेल. असे दिसते. सर्वसामान्यपणें रंजक न वाटणाऱ्या आणि इतर प्रचलित मासिकांच्या आकर्षक (व अनिष्ट ही) प्रवृत्ति न जोपासणाऱ्या ह्या मासिकाला प्रसिद्धीपूर्वीच चार पांचशे वर्गणीदारांचे सहकार्य प्राप्त व्हावे ह्यावरून अशा मासिकांची आजपर्यंतची उणीव ध्यानांत येऊ शकते. ह्या मासिकाला व्यावसायिकांचा भरपूर पाठिंबा आहे हे जसें दृष्टोत्पत्तीस येते तसेच ग्रंथप्रेमी मंडळाचे उत्साही सहकार्य ही पानोपानीहि आढळते. 'ललित'चे आम्हीं हार्दिक स्वागत करतो व त्याच्या दूरदृष्टी व व्यवहार्य संपादनानें मराठी साहित्याची प्रगती होण्यास ते दीर्घायुषी व उपकारक ठरो असे चिंतितो.

अनुक्रमणिका

## हरिभाऊंच्या कादंबऱ्या

पान १८ वरून

नेमकीं कोठलीं याचा वाचकाला पत्ता लागेल, अशी त्यांची नोंद नाहीं. महाराष्ट्राच्या भूमींत ठायीं ठायीं भुयारें होतीं कीं काय असाहि संदेह उत्पन्न होतो. पर्वतीच्या टेकडींतून शनिवार-वाड्यापर्यंत जाणारें एक भुयार आहे, अशा कथा आहेत, पण ह्याचा उपयोग केल्याची वा झाल्याची माहिती बखरींतून किंवा कागद-पत्रांतून दिसत नाहीं. नारायणराव पेशव्याला मारण्यासाठीं गारदी चालून आले तेव्हां त्याला पळून जाण्यासाठीं भुयाराची वाट दाखविण्यांत आली; भेकडपणामुळें त्यानें ती वाट सोडली, अशी गोष्ट एका विशेष प्रसिद्ध नसलेल्या बखरींत आहे; परंतु पेशवाई गेल्यानंतरच्या काळांत पुणें शहरांत चालू असलेल्या सडकबांधणीच्या कोणत्याच स्थित्यंतरानें एकसुद्धां भुयार उघडकीस आलेलें नाहीं. इमारतीखालीं भुयारें आढळलीं नाहींत म्हणून तीं डोंगर दऱ्यांमध्यें नव्हतीं, अशी कल्पना चुकीची म्हणतां येईल. महाराष्ट्राच्या डोंगरांत लेणी पुष्कळ आहेत, परंतु भुयारें नाहींत. क्वचित् असल्यास ती नैसर्गिक—सृष्टि-निर्मित असल्याचें जास्त संभवतें. युरोपांतील ऐतिहासिक कादंबऱ्यांतून भुयारांतील खलबतें वाचायला सांपडतात. मोंगलांच्या बादशाही महालाखालीं क्वचित् भुयारें आहेत. हा विषय येथें हरिभाऊंनीं स्वीकारलेल्या इतिहासकालीन वस्तुस्थितीचें स्वरूप कळण्यासाठीं घेतला आहे. हरिभाऊंचीं पात्रें त्या वस्तुस्थितीच्या अनुरोधाचीं आहेत. मग त्यांचा कारभार, हालचाली तंतोतंत तत्कालीन महाराष्ट्रीय वळणाच्या नसाव्या हें क्रमप्राप्तच आहे.

सूर्यग्रहण कादंबरीचें कथानक मावळाच्या बिकट दऱ्याखोऱ्यांतलें नाहीं. जयसिंग मोठी फौज घेऊन महाराष्ट्रांत येतांच त्यानें सासव-डाकडे मुक्काम ठेवला आणि पुरंदरगडाला वेढा घातला. पुरंदरच्या आजूबाजूचे दुसरे किल्ले तो झपाटींत होताच. पण त्याच्या स्वारीचा शेवट पुरंदरास शिवछत्रपतींनीं हार पत्करून केलेल्या समेटानें झाला. यामुळें कथानकाचा बराचसा भाग पुरंदराखालील प्रदेशांत घड-ल्याचें दाखविलें आहे. पुरंदराच्या घेऱ्यांतील स्थळें मात्र टाकलेलीं आहेत. शिवाजी महाराज आग्र्याकडे जाऊं लागले, तेव्हांचीं प्रसिद्ध शहरें हरिभाऊंच्या कथानकांत आलेलीं आहेत.

इतिहासाला भूगोलाच्या ज्ञानाचें होणारें साह्य गळीं उतरण्याला इंग्रजी ऐतिहासिक कादंबऱ्यांचा उपयोग होतो. 'आपण महा-राष्ट्राचा सर वाल्टर स्कॉट होण्याची आकांक्षा बाळगली आहे,' असें हरिभाऊंनीं आपलें मनोगत कै. गोपाळराव गोखल्यापाशीं उघड केल्याची एक आख्यायिका आहे. त्यांना समांतून कालान्तरानें विद्वानांनीं सर वाल्टर स्कॉट म्हटल्याचेंहि उल्लेख दृष्टीस पडतात, परंतु स्कॉट आपल्या कथानकाला अवश्य असणाऱ्या जागा जातीनें जाऊन पहात असे, तेथील वृद्धमुखांतून इतिहासकालीन गोष्टी ऐकत असे, इतिहासोपयोगी गाणी जमवीत असे, वगैरे माहिती त्याच्या चरित्रांत आहे. त्यानें आपल्या कादंबऱ्यांच्या शेवटीं जोडलेलीं खुला-शाचीं टिपणें पाहिल्यास तो आपलीं कथानकें उभारीत असतांना बाळगीत असलेल्या खबर-दारीबद्दल खात्री पटते. त्या टिपणांतून स्थळांप्रमाणेंच सामाजिक चालीरितींचाहि ऊहापोह असतो. हरिभाऊ इतिहासाचीं प्रका-शित पुस्तकें बारकाईनें वाचीत होते यांत संशय नाहीं. परंतु जेथें इतिहास घडला तीं ठिकाणें स्वतः हिंडून पाहिल्याचा पडताळा त्यांच्या कादंबऱ्यांतून दिसत नाहीं. उदाहरण द्यावयाचें तर 'सूर्यग्रहणा'च्या पहिल्या प्रकर-णाचें देतां येईल. परळीच्या डोंगरांतील खबरीची जागा अशी समर्थांच्या उग्रव्रतानु-ष्ठावाच्या जागेची त्यांनीं ओळख सांगितली आहे. परळीचा डोंगर पाहून हें वर्णन केलेलें नाहीं. परळीच्या डोंगराकडे जाणारे इसम डोंगरांच्या कोणत्या बाजूचें चालले होते, याचाहि पत्ता नाहीं. कथानक वाचणारा समर्थांची जागा कोणती, त्या जागेकडे पोच-विणारी वाट कोणती, शिवाजी महाराजांनीं ज्या एका विजापूरकर तरुण जोडप्याला संकटांतून सोडविलें, त्याला जेथें राहावयास ठेवले तो मठ गडावरील का पायथ्यावरील असे दक्षवाचक मनांत न आणतां कथानकाच्या ओघांत वाहून जातो. वरच्या सारखे प्रश्न-लेखकाच्या मनांत उद्‌भवून त्याचें समाधान जर कादंबरींत असते तर त्या प्रदेशाला जीवंत-पणा आला असता. हरिभाऊंच्या काळांत परळी सज्जन गडाकडील दळणवळणाचीं साधनें आजच्या इतकीं कदाचित् सुधारलेलीं नसलीं तरी साधनें होतीं व त्यांचा उपयोग इच्छा असली तर शक्य होता. हरिभाऊंनीं तो केला नाहीं.

'रूपनगरची राजकन्या' या कादंबरींत रूपनगराचाच घोटाळा झाला आहे. राज-स्थानांत 'रूपनगर' या नांवाचीं दोन ठिकाणें आहेत. एक माजी किसनगड संस्थानाची

### दीपावली बुद्धिबळ क्र. ५ चे विजेते

१ सौ. वसुधा यशवंतराव जगताप प्लॉट नं. १८०, शंकर नगर, नागपूर

२ सुधाकर जनार्दन सोमण, ३६९, शनिवार पेठ, पुणें–२

३ विजयकुमार भगवान अभ्यंकर पुणें विद्यापीठ, मुलांचे नवे वसतिगृह, खो. नं. ४०, गणेश खिंड, पुणें–७

४ कु. सुधा सदाशिव रिसबूड 'नंदादीप', फडके बंगला, टिळकवाडी शरणपूर रोड, नाशिक शहर

५ नरेंद्र नागनाथ तेंडुलकर आनंद कोर्ट, ब्लॉक नं. बी ४, सेंट मार्टिन्स वान्द्रे, मुंबई

• विजय प्राप्त करणाऱ्या वरील पांच भाग्यवान विजेत्यांना एक वर्षासाठीं दीपावली मासिक भेट पाठविण्यांत येईल.

पहिल्या राजधानीचें व दुसरें नव्यानें उगवलेलें उदेपूर संस्थानाच्या हद्दींतलें. ज्या रूपनगराचा हरिभाऊंच्या कथानकाशीं संबंध आहे तें पहिलें. पण उदेपुराच्या महाराण्याला वरूं इच्छिणारी राजकन्या उदेपूरच्या हद्दींतील असावी असा ग्रह हरिभाऊंनीं स्वीकारून आपली कादंबरी रचली आहे. कथानकाच्या दंतकथेला हा ग्रह बाधत नाहीं, परंतु स्थळ-काळाला बाधतो व स्थळकाळाविषयीं ज्यांना ज्ञान असेल, त्यांचा किंचित् हिरमोड होतो. हरिभाऊंनी या कादंबरींत जोधपुरच्या राज-कुमाराचें औरंगजेबाच्या तडाक्यांतून संरक्षण आणि रूपनगरच्या राजकन्येची त्या बाद-शहाच्या तावडींतून सोडवणूक अशा दोन भिन्न कथा एकत्र जोडल्या आहेत—जोध-पूरच्या जसवंत सिंगाच्या मुलाला विषारी पोषाख घालावयास लावून ठार मारण्याचा प्रसंग केव्हांचा याबद्दल निश्चित वर्ष राज स्थानाच्या इतिहासांत आढळतें. राजकन्येची हकीगत एखाद्या दंतकथेसारखी आहे. जोधपूर व खरें रुपनगर या जागा एकमेकापासून दूर आहेत.

जोधपूरच्या राजपुत्राला वाचविणारा दुर्गादास आणि राजकन्येला सोडविणारा राजसिंह हे दोघे वयाच्या उतारावरील पुरुष असूनहि हरिभाऊंनीं त्यांना लोकाभिरुचि-प्रीत्यर्थ तारुण्याच्या काळांतच ठेवलेलें आहे. कादंबरीचा नायक तरुण पाहिजे, हा इंग्रजी कादंबऱ्यांचा दंडक हरिभाऊंनीं संभाळला. तसें करतांना त्यांनीं संदिग्धपणा राखण्याचीहि काळजी घेतलेली दिसते. इतिहासाप्रमाणें जोधपुरचें प्रकरण उपस्थित झाले तेव्हां राजसिंहाचा एक बत्तीस वर्षे वयाचा मुलगा मुसलमान सत्तेशीं लढत असल्याचा संदर्भ निघतो. ज्याचा मुलगा बत्तीस वर्षांचा त्याचें वय किती असावें—अठराव्या वर्षी पुत्रप्राप्ति मानल्यास देखील राजसिंहाची पन्नास वर्षे हा अंदाज करतां येतो. राजपुताच्या लग्नाला वयाची मर्यादा आडवी येत नव्हती व तेव्हांच्या उपवर मुली ज्याच्याशीं लग्न करावयाचे त्या पुरुषाच्या वयोमानाचा विचार करीत नव्हत्या. तेव्हांची सामाजिक मनोरचना आजच्याहून भिन्न होती, हें विस्तारानें सांगा-यला नको. पण हरिभाऊंना इंग्रजी राजवटीं-तील समाजाला रुचणारी कादंबरी लिहावयाची होती म्हणून त्यांना दुर्गादास व राजसिंह या दोघांना तारुण्यांत ठेवणें भाग पडलें. रूपनगरांच्या गफलतीमुळें कथानकांतील कांहीं प्रसंगांना थोडी वेगळी दिशा लागलेली आहे.

कथानकांत चुका असूनहि हरिभाऊंच्या उषःकालादि कादंबऱ्यांची गोडी कमी झालेली नाहीं, याचें कारण हरिभाऊंची कथनशैली. हरिभाऊ एकेका कादंबरींत विविध स्वभावाचीं पुष्कळ पात्रें आपल्या कादंबऱ्यांतून सोडतात. त्या पात्रांच्या आपसांतील व्यवहाराची गुंतागुंत वाचकांची उत्सुकता वाढवीत जाते. यामुळें ऐतिहासिक पात्रें कोणत्या जागीं आपलीं कामें बजावीत आहेत, याचें भान वाचकाला रहात नाहीं. इतिहासविषयक कादंबरींत गतकालीन वस्तुस्थितीचा त्यांतच प्रदेशाचा अंतर्भाव समजावा. मान राखणें जसें आवश्यक तसाच मानवी स्वभावाचा मान काटेकोर पणानें संभाळणें आवश्यक असतें. हरिभाऊंनीं मानवी स्वभावाकडे जास्त लक्ष पुरविलें व त्यामुळेंच त्यांचीं ऐतिहासिक कथानकें अद्यापि मागें पडलेलीं नाहींत. हरिभाऊंनीं कथानकाच्या भूभागाकडे दुर्लक्ष केलें असले तरी त्या बाबतींत धक्का बसण्यासारखा विपर्यासहि होऊं दिलेला नाहीं, हें त्यांचें चातुर्य वाखाणण्याजोगें आहे. धक्का बसेल असा थोडासा भाग उषःकालांत आहे. परंतु मानवी व्यवहाराच्या मांडणीची गोडी तिकडे वाचकांचें लक्ष जाऊं देत नाहीं, हें सुद्धां लक्षांत ठेवणें बरें.

आज महाराष्ट्रांत सर्वत्र हरिभाऊंच्या जन्मशताब्दिनिमित्त जिकडे तिकडे त्यांचा जयजयकार चालू असतां त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतील दोष दाखविण्याचा प्रकार चमत्कारिक वाटेल. परंतु हा प्रकार हरि-भाऊंच्या कादंबऱ्या विचारांत घेऊन सर्वच ऐतिहासिक कादंबऱ्यांतून कथानकाच्या प्रदेशाबद्दल आस्था नसल्याचें निदर्शनास आणण्यासाठी अंगीकारला आहे. हा विषय पूर्वी चोखाळला गेलेला आहे. पण त्याचें आणखी एकदां स्मरण द्यावें एवढाच या लहानशा लेखाचा हेतु आहे.

● ● ●

## महत्वाची सूचना

दीपावलीच्या क्रिकेट पुरवणीमध्यें प्रसिद्ध केलेल्या **'क्रिकेटवर बंदी कां ? घालू नये'** व **क्रिकेटविषयक प्रश्नपत्रिका** या दोन स्पर्धांची मुदत वाढविण्या-संबंधी अनेक वाचकांची पत्रें आली असल्यानें व अजून बऱ्याच वाचकांना स्पर्धेत भाग घेता यावा म्हणून या दोन्हीं स्पर्धांची मुदत १० एप्रिल ६४ पर्यंत वाढवीत आहोत. निर्णय जून ६४ च्या अंकांत देण्यांत येईल, ह्याची स्पर्धकांनी नोंद घ्यावी.

—संपादक








दीपावली बुद्धिबळ क्र. ६:



"दीपावली बुद्धिबळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव ____________________

____________________

पूर्ण पत्ता : ____________________

____________________

## दीपावली बुद्धिबळ क्र. ६

येथें कापा.

### आडवे शब्द

२ सोवती
४ लेखणी
६ रक्तशोषक जंतू
७ फरफटका
९ मोठी पाटी
१० "पोटाशीं असलेली" स्त्री
१२ मोठें तळें
१५ गणितशास्त्रावरील सुप्रसिद्ध ग्रंथ
१८ त्रास–पीडा
१९ गुराखी
२० एक भाषालंकार
२१ जोडयाचा खालचा भाग
२२ वारीक फटींतून येणारें उन्ह
२३ नम्र

### उभे शब्द

१ शक्तीची अधिष्ठात्री देवता
३ वरिष्ठ विधिमंडळांतील समासद
४ राजहंस
५ शंकर
११ घोडा
१३ रोगानें पीडलेलें
१४ जत्रेंतला फिरता पाळणा
१६ लक्षाधीश
१७ वडील
१८ एक नृत्यप्रकार

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख**
**१५ एप्रिल १९६४**
**अधिकृत उत्तर–पुढील अंकांत.**

**स्पर्धकांकरितां नियम व अटी—**

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.
२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.
३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** मरलेली असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**
४. उत्तरें **'दीपावली बुद्धिबळ,'** संपादक, **'दीपावली,'** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावीत.
५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरां-तून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** दीपावलीचे **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठ-विण्यांत येईल.
६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.
७. स्पर्धेबाबत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबाबत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**
८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १५ एप्रिल १९६४ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

### "बुद्धिबळ" क्र. ५ चें उत्तर—

**आडवे शब्द**

**१ वंतकथा, ३ कडबा, ५ पटांगण, ७ वसंत, ९ पत, १० टोपकर, १२ असिलता, १३ ओघ, १६ मचवा, १७ पायचाकी, १९ कासरा, २० सरकार**

**उभे शब्द**

**१ दंडवत, २ थाप, ३ कण, ४ बाणेदार, टांग, ८ तपशील, ११ पडघम, १२ अनामिका, १४ जवाहीर, १५ भाचा, १७ पारा, १८ कीस**

**विजेत्यांची नांवें**
**पान ५६ वर पहा**

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




